विशई पाठविल्या त्या पावल्या ज्यांच्या त्यास पावत्या केल्या नवाब निजामन मुल्कानी तेच समई फर्दावर दखखत करून सनदेस हुकूम केला व हेच बोलिले जे थोरले हजरत यांही चांभारगोद्याची सनद जाली असतां मान्य न केली कां की हजरत फिरदोस आरामगाहाशीं व बडे हजरतसी कुराण दरम्यान आलें होतें जे विलस्तभर जमीन सिवाय माझ्या तजविजेखेरीज न व्हावी जाली तर त्या मान्य न करावी या गोष्टीचें वचन हजरत फिरदोस आरामगाहानी दिधलें असता नवाब इतमादौले शहीद याणी उमदतुलमुल्कास पुढें करून फर्माण वाला शान अलतमगाहाचा करून दिल्हा या गोष्टीकरितां मजलाही बहुता प्रकारें लिहिले व नवाब इतमादौले शहीद यांसही शब्द लाऊन लिहिलें व पातशाहास लिहिले जें मीं येक बिलस्तभर जमीन देणार नाही त्यामधे किल्या-खालील जागा मऱ्हाट्यास दिघल्याने येक अंगोलीबराबर दस्तावेज दिधला म्हणजे पोहच्या सुधा हात निगळूं म्हणतील त्यास त्याणी राणोजी सिंदे सुभेदार यांचें व रामचंद्रपंताचें स्वरूप जाटलें नव्हतें त्यासी कामही पडले नवते सांप्रत रा जयाजी सिंदे सुभेदार येऊन आमच्या इष्टत्वाची कदर जाणून सार्वभौमास मायेंत घेतलें यावरून बापापेक्षां पुत्रापासून विशेष उमेद त्या पुत्रास सपूत म्हणावें म्हणून बहुतच स्तुती केली व हेच निश्चय जाटलें जे आमचे जे जे मरकूजखातर कामे आहेत ते सार्वभौमाच्या मनोदयानरूप आपाचे हातून होतील व यांची सरदारी ते आमच्या सरदारीची व पंतप्रधानाचे सरदारीची बाजू आहे त्यास येक गांव अथवा च्यार गांव देणें याचा मजकूर काय बलकी सुभेदारी त्यांची आहे कोन्या मोहरेनसी फर्द रामचंद्रपंताजवळी पाठवीत होतो त्यास सन्नीध रामचंद्रपंत असतां दूर फशास जावें याकरितां आपाजवळी फर्द पाठवा व दामोदरपंतास लिहा जे हे सुभेदारी तुमची व मुखतार तुम्ही चितास येईल त्यास बकूसून द्याल तर मजला कबूल आहे बिरादर मेहरबा वजीर आजम लिहीत असतात म्हणून लिहिलें तरी त्याचे बिरादर लिहावयाचे व माझे सत्य माझें चितांत हें आहे जे मिरबकशीनी जाऊन रजपुतांस बिघाडलें त्यास आपाचे हातून मल्हाररायाचीं मुलाजमत करऊन रजपूत व मोईनुन्मुल्क व इतमादौले लाहाण थोर सर्वांस याचे घरीं आणावें व आपण मीर बकशीगरी घेऊन नियाबत पुत्रास देऊन तुम्हासी जो करार केला त्याप्रा द्रव्यही द्यावें व पातशाहाचे घरीं आपाची इखतियार { यखियार } आहे इत्की गोष्ट महशूर जाली म्हणजे बावीस सुभे यांसी रुजू राहतील मग ज्यांस मारतील त्यास पातशाहानी मारले ज्यास ठेवितील त्यास पातशाहानी ठेविले इत्कें करून दक्षणेस चालतील तर आपाचें नाव........

ले. २२ अधिक आषाढ वद्य ८ भौम } श्री पो छ २ शवाल { श. १६७४ अ. आषाढ वद्य ८ इ. १७५२ जून २३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापू ता राजश्री दादा ता राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पो गोपाळराव गणेश कृतानेक सां नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ आषाढ अंधीक बहूल ८ (९!) भोमवसर जाणून स्वकीये लेखन करीत आसिलें पाहिजे विशेष बहूत दिवस जाहाले स्वामीकडून पत्र येऊन परामर्ष होत नाही येणेकरून चीत सापेक्ष आसे यैसे नसावे निरंतर येणारासमवेत लेखनद्वारें सांभाळ कीजे यानंतर श्रीमंत राजश्री [मो..जा.*] उभयेता सरदार यानी श्रीमथुरेपासून श्रीमाहाक्षेत्र परगणे बनारस हवेली येथील परवाने देऊन मामलत सागून रवाना केलें ते श्रीप्रयाग क्षेत्रास आलों बलवंडसिंग राजा पांच हजार फौज व पांच हजार प्यादेनिशी श्रीमाहाक्षेत्री मुकाम केला होता त्याने आम्हास साफ सांगून पाठविलें कीं तुम्ही पुढें न येणें आपला तुमचा कजिया होईळ त्याजवरून मुकाम मजकुरीं पंधरा दिवस मुकाम करून हजार प्यादा व सातसें राऊत सिबंदी ठेऊन कूच करून क्षेत्रास चालिलों राजा मजकूर चाळून पुढें आला हर्शामर्षे सोडून विवेकावर घाळून प्रथम मुदा कीं वजिरानी परवाना बदल मुरवत सरदारांस दिला आणि आपणास पांचसात परवाने पाठविले कीं आमल सहसा न देणे यैसें आसता तुम्हीं किमर्थ बसलां माघारे जाणें आम्ही रेंटाई करतांच हवेली दिली आहे आमीनी व सायेर नाही हाचि मुदा कितेक दिवस जाहाला याचे खालें महिना गुदरला त्याजवर म्हणूं लागला कीं प्रताप नारायेण समीप आले आहेत त्यानी परवानगी...

---

ले. २३ वैशाख वद्य ७ नंतर } श्री पो छ १८ जिल्काद { श. १६७५ वैशाख वद्य ७ नंतर इ. १७५३ मे २४ नंतर

पुा चिरंजीव राजश्री दादा यासी आशीर्वाद उपरी रा अताजी माणकेस्वर यांची पत्रे वैशाख वद्य ७ रा जयाजी सिंदे यास पावली तेथें लिहिलें आहे कीं पातशाहाचा वजिराचा कलह होये पातशाहा दुसरा वजीर करी व वजीर दुसरा पातशाहा करी शहर लुटले जाय लोकांचे जीवासी गांठी पडे यासी बुनियाद येक बापूजी माहादेव कसे म्हणाल तर पातशाहा निश्चित आपले घरांत होते याणी आम्हांस दिलीस आणिले पातशाहासी बालिले कीं जसी हे फौज आणिली असी साठ हजार फौजेनसी श्रीमंत राजश्री रघुनाथराव उभयथा सरदार यांस तुमचे कुमकेस आणितो म्हणून पत्राचा तात्पर्यार्थ लिहिला यैसियासी सफदरजंगानी नवाब बाहादुरास मारल्यावर पातशाहानी तेही गोष्टी चितास न आणिली व दिवाण

पेटऊन चौचौ हजारा मणुष्यानसीं जेव्हां मुजऱ्यास ये तेव्हां दग्याऱ्याच इरादियाने ये जे दिवसी पातशाहावर हात टाकावा .असा डौल याणी घातला तेव्हा पातशाहानी अवघ्या अरकान वगैरेपासून मुचलके घेतले जे यास सर्वथैव मारावें पातशाहानी आम्हास म्हटलें जे सरदारानी कौल अहद करून गेले तो प्रमाण आहे तर तुम्ही आपली मोहर करून द्या नाही तर तुम्हासीं यासी समजून घेऊं तेव्हा आम्ही विनंती केली जे बाळाजीराव हजरतचा असा फिदवी आहे जे त्याचा भाऊ अथवा त्याचा लेक हजरतसी अतुल करील तर त्याचाही मुलाहिजा करणार नाही तेथे सफदरजंगाचा काय मजकूर परंतु माझी मोहर करून द्या याकरिता म्हणता जे गुमस्तियाचा विकला साहविला तो वकिलाची मोहर मवकलाचीच आहे त्यास माझ्या मवकलानी मोहर करून द्यावी तर अब्दाली यास मारायाची करून द्यावी सफदरजंगाची कुमक करून त्यांचे सरदारानी ठेविलें याजकरितां त्यांजला मोहर करणें असलाध्य मजला मोहर करणें अश्लाध्य याकरिता जे माझे धाकटे भावानी त्याजला ठेविलें तो म्हणेल जे माझे ठेविलिल्यास तुम्ही मारिलें तेव्हा त्याजदेखतां शरमिंदे होणें लागेल तुमची तर चाकरी केली पाहिजे व आपल्या मवकलाचा उजूस ठेविला पाहिजे यास्तव माहाराव परशोतमपंताची मोहर हाजर आहे उद्यां कदांचीत राजे राव दामोदरपंत मजला शब्द लावील तर त्याजला म्हणावयास हे जागा आहे जे अकबराबाद अजमेर तुम्ही नानास मुकरर केली त्याचे जमीदारास त्याणी वरगलाणिले याकरितां ते परस्परें जुजले या रीतीने हें वर्तमान जालें जेव्हा सफदरजंगावर तोफखाना रचून बाहेर काढिलें तेव्हां त्याणी आमची मिनत माजरत बहूत केली ते समई जितके चाकरीचे मार्ग आहेत तितके त्यांपासून लिहून घेऊन पातशाहाजवळ सिफारश केली पातशाहानी व नवाब कुतसिया याणी आज्ञा केली जे तुमच्या मवकलास सर्वश्वे पातशाहाजाद्याची स्थलें देऊन आपला जिगर जाटले याचे कारण जे याची सी...

---

| | | |
|---|---|---|
| ले. २४<br>सफर १३ | } | { श. १६७५ मार्गशीर्ष शुद्ध १४<br>इ. १७५३ डिसेंबर ९ |

श्रीमंत रा॰ बापूसाहेब...सा॰ सेवेसी

सेवक धर्मराव तमाजी कृतानेक सा॰ नमस्कार विनंति उपरी येथील कुशल छ १३ सफर मा॰ सवाई जयेपूर जाणून स्वामियानी स्वानंदवैभव लेखन करावयाकारणे अज्ञा केली पा॰ यानंतर येथील वर्तमान काळ रविवारी प्राथःकाली गणेश विनायेक व श्रीकृष्ण मिश्र सरदाराकडून अले ते त्रितीये प्रहरीं श्रीजीचे हजूर उतर प्रतिउतरेकडून तादूल व दाल व चिनशाकचे जोडे घेऊन रातोरात परतून गेले बहूत करून दिवाणजीस वेलभंडारानुरूप भले मनुष्यास

अणावयानिमित्य गेले विना मातबर दारमदार करणार कोणी या पंचायतेत नाही दिवाणजी गेल्या सर्व निरधार अनासे होऊन राहील श्रीकृष्ण मिसर इता(त)केही म्हणत होता की जयाजी सिंदे अल्याअगोधर मामला फडछा होईल तर उतम अहे विलंब लावल्या न कले कैसा प्रसंग पडतो जयाजीही तर निवाईसमी[प*] पावल्याचे वर्तमान अहे बहूतकरून तर सिंदेही समयावरच पावतील येसे दि...भगवान...तो दिवाणजी......

[ पाठीवर* ]

रा़ो त्रिबकपंत बाबा व रा़ो गिरमाजीपंतास नमस्कार कृपा वर्धमान कीजे हे विनंति

---

| | |
|---|---|
| ले. २५<br>सफर १६ | श. १६७५ मार्गशीर्ष वद्य २<br>इ. १७५३ डिसेंबर १२ |

...कुशल तागाईत छ १६ माहे सफर...[चं]दलाई विनये कटक श्रीमंत [मो. जा.*] दादासो [स्वा]मीचे कृपाकटाक्षे येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तर पहिले स्वामीचे सो लेखन करून पाठविले असे ते चिरंजीव धर्मरायाचे विद्यमाने पाऊन सर्व निवेदन जाले असेल राजश्री गणेश विनायेक यांचे विद्यमाने श्रीजीचा जाबसाल दिवानजीनी विष्णु माहादेव याजकडे लाविलाच होता आतांही बानीकार तेच सर्वस्वें त्यानी येथून येकांत लोकांत करून जैनगरासी जाऊन येथें सरदारांसमीप आले येथून राजश्री विठल सिवदेव व आपा व विष्णुपंत या त्रिवर्गासी वचनकथनानरूप किरपाराम नाटाणी व मिसर श्रीकृष्ण व गणेश यादव व पांडुरंग शंकर हे सकलही घेऊन गेले वीस हे मागतात [ते] पंधरा पावेतों आले अम्ही...रात्रदिवस...ही वाईट न मानावे... तटस्थ राहिलों आजी सर्व चालिले तेव्हा...व किरपाराम यानी आग्रह केला कीं तुम्ही चला आम्ही विदा जालों वरकडही सर्व रातोरात जाणार त्यास म्यां उतर दिधलें कीं तुम्ही आपल्यासमागमे मजलाही विडे देऊन विदा करवितेत वरकड तुमचा जाबसाल तुम्ही करा बरें मीं वाटच मोजीत तुम्हाबरा येतो येथें आलेत तो निरालें ठेविलें व तेथूनही निरालें केलें अतां विनारुकसत कसें जावें म्हणून न गेलों राजश्री देवाजीपंतास शाहीद हाल तरीक पाठविलें आहे पाहावें आजी तर ते पावले असतील दिवानजी येऊन किती निशा नगद देतात व काये टीपटाप देऊन बाजी पेश नेतात व बाकीची कसी वाट करितात हें सर्व द्रिष्टीस येईल राजश्री आपा यां...पूर्वी ज...ला असता तर हो......

---

ले. २६ } पो छ २३ माहे { श. १६७५ मार्गशीर्ष–पौष
इ. १७५३ अखेर

......राजश्री आपा याजकडील उतरें आली ते [पाठ]विलीं आहेत त्यांसही मागती जे काहीं इकडील प्रसंगी ल्याहायाचे तें ल्याहावें इकडील मासिलत कदीमेपासून आपली या राज्याकारणें जीवप्राण गेले असतां यांची हे रीत खाली मैदान पाहून रंगोजीपण यांनीं माडिले आहे भगवान समर्थ परिणामही दाखविल्याखेरीज कसा राहतो अस्तु कोणेही रीतीने मासिलत फडछी होऊन दिवानजीचा मनोदये पूर्ण जाला म्हणजे लक्ष पावलें भगवान यांचे कुशल करो श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] गणपतरावही बुंदी प्रांती आले असावेत उजेनीहून चाल्याचा समाचार राजश्री बाळाजी शामराज यांचेंथे आला घरची जोडी व राघोजीबावाकडील जोडी मार्ग सुपथ नाही म्हणून येथें बसली आहे राजश्री तात्या यांजकडून आंपासी लिहिवायाचें तें लिहिविलें पाहिजे तात्या माणसाची कदर जाणतात ते असते तर इत्कें तटस्थ न ठेविते सालिग्रामपुरा व वरकड गांव तहसनहसींत येऊन नाशातें पावले बसईत दाहा राऊत बाणदारीस त्यांस नित्यानी पंनास साठी रुपये लागतात यासिवांये खुराक जरी काहींक दिवस इकडेंच राहणे जालिया मोठी नुकसानी आहे मीर बकशीचे तर पल्यावर परंतु भुकंड व वजीर द्रविष्ट जंग...नाहीत कोणे...पोकल गोष्टी घेऊन काये करितील जकार यासी व यांसी मनोविकल्प बहूत वाढलासा दिसतो परंतु दादासो तूर्त यांचे अनुमतेवर याजकरिता त्यासही खावंदाची मर्जी तोडितां येकायेकीं कसी बनते जरी यानी निःकेवल बकशीकडेंच चित दिधलें तर ते वजिराकडें लागतील यास्तव वजिराकडीलही सूत्र हाती ठेवावे व मग जसा प्रसंग पाहिला जाईल तसा करणेत येईल इतक्यावर नवल विशेष जे होऊन येईल ते विनंती केली जाईल बहूत काये लिहिणे कृपा असों दिधली पाहिजे आजी गुरुपुष्ययोग याजकरितां श्रीमंत सिध होऊन जाऊन जयाजी अपास अणतील येवंच जयाजी अपा येऊन शामील जाले जाणावेत मागून समशेर बाहादूरही लवकरच येणार विदित होये हे विनंती

राजश्री बाबासो नमस्कार विनंती उपरी सविस्तर श्रीमंत [ मो. जा. * ] सो लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल इत:पर पाहावें काये सोहबत बाब खाते कृपावृधी करावी हे विनंती

---

ले. २७ } { श.
इ.

...कून गणेश विनायक...हे उभयेता रातोरात...व जाऊन आले तुल्य हे कीं दिवान हरि गोविंदजीस अणून फैसला रुबरो द्यावा हे यांची [ वास ]ना व दिवानजी सर्वा गोष्टीचा निरधार हो...वचनकथन वेलभडार

कोणीक मातबर [मा]णूस घेऊन गेल्याखेरीज काये रामपुरा व...परगणे व बाकीटाकीची किस्तबंदी के[ल्या]खेरीज व दाहा पांच जे घेणे तूर्त नगद निशा त्यांत येक दोनी अधिक अगले निश्चये ठहरल्याखेरीज विस्वास पुरऊन कसे...त राज्यांत तर सर्वा गोष्टीचा तोटा...हिले उाहार यासी दिवान विद्याधरजीखा[रि]खा मोठा माणूस होता अतांची बाजी सर्व दिवानजीवर येऊन बनरवाली आहे व हे जे कांहीं...स्तकुशाद आहेत ते स्वामी पूर्ण जाणतात पाहावें राज्यांही तर बहुतेक यां उभ...बा खास शुका लिहून दिधला साही...ज्य सर्वस्वें तुमचे दिधले...खी विनंती केली जाईल...कुल तहसनहसीत नित्यानी मिल...जवल नित्यानी फौजा येतच जातात व त्यासमीप जे आहेत ते अंनात्रिणावांचून काल-[क्र]मणा करितात शहरचाच गर्दा पेश...[द]रोबस्त करितात यांसी रुजुवातच ...ज्याने परिणाम त्यांचा उतम थोर आहेत परिणाम जाणतील ते करितील मुख्य अपला...प्रसंग तर इत्के दिवस जे चाकरी जाली ते केली अतां ज्यांचे चितासीं येईल ते करोत प्रस्तूत जामिनीचे बाकीचा कजिया केलियां शब्द ठेवितील कीं पहिले पहल यानीच फ[रग]डे घातले त्यासी सर्व निवडल्यानंतर...होणार ते होऊन राहील म्हणून सुलाम श्रीमंत [मो. जा.*] सो. करून तटस्थ बसतो... कृपा करितात कोणेही रीतीने राज्याचा सौरष्य राहो स्वाचंद खूश होऊन ठेविती ...हून राहवितील तर रा[हवोत]...समागमे चा...

---

ले. २८ } { श. इ.

मेहमानी...थील ठाउकीच आहे...वर द्रिष्ट देऊन केवल कागदापत्री समज...हेही गोष्ट तथ्यासारिखी दिसते कांहीं दिवानजीचे धूर्ततेवर समजतील तर न कले विष्णू माहादेव यांचा ऐवज बाकी सरकारांत दोनीचार लाख असलियां पांच साहा अणखी अगें[जू]न दाहापावेतों त्यांचे मामिलतींत येतील व्याजबटा टीपटिपावण सिबंदी वजा जाऊन मा...तरा...येईल तेव्हां दिवानजीचे डोले उघडतील अपल्या चाकीटाकीचा किमपि मजकूर आ[द्या]पि जाला नाहीं सांप्रत नगद इत्के घेऊन गोष्ट मात ठहरावावी याजकरितां भलत्याप्रकारे दिवानजीस येथवर आणून वरकड किरकोल मामिलत रामपुरा व चारी परगण्याचा व वरकड सर्व मग...क्रमेकडून समजून घ्यावा व करारदादेंत... रिरवी गोष्ट आणावी दिवानजी...मामिलतवर...मंडली नयेनगरासी [किं नि] मिस्य गेली खाली मैदान किमर्थ टाकावे म्हणून देवाजीपंतासी समागमे दिधलें आहे तेथील...ते लिहितील त्याजवरून कलेल आर्जी मी [मो. जा.*] सुभेदार सोजवल गेलों त्याहींहून सकलही वर्तमान पुसले विस्तारेंकडून सर्वा स्थलीचें वर्तमान [निवे]दन केले बहूत प्रसंन्न जाले बकशीचे चद...गिरी...जाटाचे

तंबीहेवर बहूत करून...ले शुका घ्यायाचें ठहराविलें श्रीमंत [ मो. जा.* ] दादासाहेब यांजकडेष्पाठऊन सुमुहूर्तानरूप...वी शुक्रवारी घ्यायाचे ठहरलें श्रीमंत [ मो. जा.* ] सुभेदारजीचे कृपेस कोठवर ल्याहावें भगवान यास चिरंजीव राखो दिवानजीकडील कुष्टदिष्ट सर्व श्रुत केलें प्रसंन्न होऊन बोलिले कीं निराला जाब-साल लाविल्यावर काये पोहचे व कोणते का...या गोष्टी....

---

| | | |
|---|---|---|
| ले. २९ | श्री | श. १६७५ माघ शुद्ध ४ |
| पौ रखर ३ | पौ छ ३ राखर | इ. १७५४ जानेवारी २७ |

विनंति उपरी घनेश्वरजीनी वस्त्रें व शीरणी आणून बहूत कांही सिष्टाचार केला बार बरदार व अटाला तर राजामलजीचे हवेलींत उतरला होता व घरींच सर्व समुदायेनिसीं सौ मातुश्री ताई होती केशोदासजीचे स्त्रीचे भेटीनिमित्य गेलीं होती तिनेही येथायोग्य सिष्टाचार केला विदित होये बसईचे ऐवजी दुसरा गांव दूरबस्त द्यावा हा करारमदार न कले सरदारांसी येकांती दिवानजीनी कसा काये केला परंतु घरीं बसल्या मार्येपुढें वलगना करितात कीं सरदारांची परवानगी आणिली आहे न कले या खलष्याकुरकेचा इंगाम्यांत नजर फेरितात किंवा विसरभोलेखालें नेतात याचे ताकीदपत्रांस्तव पहिले विनंति केली होती अतांही विनंति लिहिली जाते जो तरतूद करायाचा तो स्वामी करितील रो राणा प्रताप-सिंगजी तर निवर्तले त्यांचा पुत्र नेत्रेकडून अंध म्हणत होते त्यासच रजपुतांही राजीं बसविलें....सा बहूत म्हणून म्हणतात व नाथजीसही बोलावणी गेली आहेत ऐसी वार्ता ऐकिली जाते पो काये मागती वडोन येतें कृपा असों दिघली पाहिजे हे विनंति

राजश्री बाबा स्वामीचे सो सां नमस्कार विनंति विस्तारे श्रीमंत सो लिहिलें असे त्याजवरून सर्व अवगत होईल राजश्री देवाजीपंतासी पाठविलें असे सो पाऊन सर्व निवेदन करितील तदनरूप जे तदबीर ते करितील बहूत काये लिहिणे कृपा असों दिघली पाहिजे हे विनंति कासीदजोडी टोकेंस पाठविली तिजला रुपये ६ साहा दिघले म्हणून सटवाजी यानी सांगितलें विदित होये हे विनंति

---

| | | |
|---|---|---|
| ले. ३० | ३ | श. १६७५ माघ शुद्ध ४ |
| पौ रखर ३ | पौ छ ३ रारवर | इ. १७५४ जानेवारी २७ |

...वाजी त्रिमल यासीं देऊन स्वामीनिकट पाठविलें आहे जरी श्रीमंत दादासो लस्करांतच असतील तर उतमच नाहीं तर त्यांजला श्रीमंत दादासोसमीप पाठवावें

कीं प्रसंगोचित सर्व विचार येथील श्रुत करितील तदनुरूप जो कर्तव्यार्थ तो करायासी स्वामी समर्थ आहेत सारांश या दिसांत दिवा[न]जीनी ममतेंकडून भाशण केलें कीं चौघांतून येकानी श्रीमंत नानासो हजूर राहून तेथील साधना ठेवावी त्यासी सर्वांही गोष्टीची छांडी त्यानीच केली आतां श्रीमंत नानासो लिहिलें श्रीजीस आलें की इतके दिवस तुम्हाकडील भला माणूस हजूर राहत होता आतां कोणीही नाही तर येखादा भला माणूस पाठविजे की मुदामी राहून जाबसाल सरगरम राखी ये रीतीने बहूत काहीं परस्परें जाबसाल उल्हाणी पुलहाणी जाली बरें जे जाले ते जाले परंतु तुम्ही हे वर्तमान दादासो लिहून उतर आणवणे म्यां पत्र लिहिलें त्याचे उतरही त्यानी न लिहिलें म्हणून बहूत काहीं ममता दाखऊ[न*] म्हटले त्यासी आचरण तर यां लोकांचे कळून चुकले परंतु समानसाजी केलीच पाहिजे आजी किती वर्शे लोटलीं कीं या दरबारची साधना नाना रीतीने जीवें अर्थे करायासी स्वामी न चुकले केल्या कर्माचे फल हे पाहवीलच पाहतील तथापि अपल्याकडून सिष्टाचार पत्री वेव्हारी कां चुकावें श्रीमंत दादासोकडून सिष्टाचारयुक्त पत्र लिहून पाठवावें [मो. जा.* ] बलके माझे पसगैबतही सिष्टाचार पत्रें येत जात दस्तावेज मात्र स्वामीनी न गोवावा बलके स्वामीनी काहींक दिवस मौन्यताच धरून त्यांचा स्वकीये इतर वाणी जो कोणी येत जाईल त्यासमीप सिष्टाचारच करीत जावा परंतु दादा यांजकडून बहूत गर्मी पत्रापत्रीं ठेवावी व ऐसी तजवीज करावी कीं येकदां काहीक मनसब्यानरूप दादासो येथे येणे होऊन दिवानजीकडील संदेह दूर होये ऐसा योग जालियां आनायासेंकडून येकदां हिसेबचा निवाडा होऊन जाईल मग पुढें पाहून घ्यावे ओडगाडूमधे डोई खुबसून राहिले आहेत यां सर्वांचा उछेद करून येथापूर्वक हलचाल सर्व अपलाच जिमा जालिया उतम आहे वरकड न होये तर सुखें न हो हिसेबाचा रुजूसुकाबिला काहीं सुप्रवृतीने दिवानजी करितात ऐसा अर्थ नाही दादासो भेटीने काहीं न काहीं मार्ग होऊन जाईल व वरकडांचेही स्वरूप दिवानजीस कळून चुकले आहे राहिलें साहिलेंही कळून चुकतें कोठे डोले चोरील वरकड किमात्रें आहेत काये श्रीकृपेकडून व अपले प्रतापेकडून माजीवर कोणाचा कनोडा नाही हिसेब मनास आणितां सर्व निदर्शणासी येईल चिंता काये दोनी दिवस तहवरी व सुलूकी जो जे करील ते भोगणे पडली स्वामीचे प्रतापेकडून तेही निवारण होऊन जाईल मोठा कजिया दोनी लक्षाचे हुंडीचे बाकीचा बाकी दीड लक्ष तो तीया...न तेही बोज्या हिसेबी गोष्टीपुढें कसी पेश जाते सर्व देवाजी त्रिमल सो निवेदन करितील व्याज व टीपटिपावण दिवानजीचे हाते लिहिली आहे साहेब मामिलत होऊन कोणी फड टाकील व मनासी आणील तर लक्षावध इतरांसी हाली व पहिले जे काहीं टिपावण व्याज दिधलें आहे त्याप्रमाणे कलमी गोष्ट धरिलियां मुबलग वाजबी होतात कोठवर दिवानजी मुतिया करून पेश नेतील परंतु मैदान खाली

पौ छ ३ राखर ४

बोलूनही काये साध्य म्हणून दिवानजीचीच मर्जी रक्षिली ऐसियासी ऐसा काहं मनसुबा विचारावा कीं येकदां दादासो येणे होऊन येथील साफी घडोन आलिय उतम आतां बहूत लांबवायाची गुंजायेश न राहिली माणिकरामजी येथून सकल सरदारांची नावें व दिलीकरांचे नावे सर्व थैल्यापत्रें घेऊन बिदा होऊन मार्गस्त जाले आहेत बहुतेक लस्करांतून होऊन दिलीस येतील अंताजी माणकेश्वर व खानखाना यांजकडील सूत्र त्यांजकडे बहुता दिसापासून आहेच दुसरे जाटाकडील व वजिराकडीलही बहूत गर्मी ठेवितात राजश्री लाला नरसिंगदासजीचा व यांचा जोडजोड आहेच जाटाकडीलही मामिलतेंत राहून कार्ये साधून सरदारांचेयेंही घसपैठ करावा हा त्यांचा मनोदये दिसोन आला जाताना मजसींही भेटून गेले बहुत काहीं मायेममतेचा गोष्टी केल्या बलके स्वामीचे नावे व दादासो नावें रुकाही लिहून घेतला व करारही केला कीं श्रीमंतासिवाये दुसऱ्याचे मध्यस्तीने सर्वथैव प्रसंग करणार नाही विठल सिवदेव व विष्णु माहादेव हे उभयेता श्रीमंताकडील सिरोवेष्टण घेऊन येऊन येथून दिवानजीस श्रीजीचे सिरोवेष्टनानरूप काहडून घेऊन जायाचा विचार केला होता तो न बनला न कले काये ढील जाली ते गोष्टही साधावी व त्यासी आणावें व आपाकडीलही येकोपा साधाव(वा) येण्या कितेक तजविजेने रवाना जाला अहे त्यासी दादासो हे पत्रें पाठवावी व स्वामीनीही लिहावें कीं आपले उपयोगी गोष्ट असलियां त्यांसी ममतेंत घेऊन अपलेसें करून दाखवावें अपलें यांत काये जाते होस हो म्हणतां पुढें जसें जसें होत जाईल तैसें करावें येशदाता भगवान आहे या दिसांत कितेक इनाम व उदक माधोसिंगजीनी दिधले होते ते सर्व दिवानजीनी खालसा केला न कले जाब-सालाचा बाहाना जाणऊन अपलेही गांव क्रमेक्रमे खालसा करावें ऐसा विचार विचारिला किंवा काये दुष्ट आहे काहीं यांचे अंतकर्णाची गोष्ट कलत नाही माया-वादीसी मायावादपण केल्याखेरीज गती नाही व विना मायावादीपण केल्या-खेरीज हिसेबाची साफी होऊन अपला गुंतारुंता निघून येणे दुस्तर असे स्वामीस श्रुत व्हावें वास्तव पूर्वीही विनंती येक दोनी वार केली आहे पुन्हाही केली जाते स्वामी जे उतम जाणतील ते करितील कृपा असो दीजे हे विनंती

---

ले. ३० } ३ { श. १६७६ ज्येष्ठ पूर्वी
इ. १७५४ जून पूर्वी

...स व पंचविसा हजाराचा पातशाहाबिबीस व पंचविसा हजाराचा पातशाहाचे स्त्रीस करून जियाफत करून हाती घोडे जवाहीर वगैरे नजर करून येक शुका मलका जमानीचा सफदरजंगास पाठवावा [ नि* ] जे तुमच्या खिजमात तुम्हास बहाल बरकरार असेत मीर बकसीस अशा करावी जे तुम्हास वकील मुतलक

सरकारचा रुपया अद्यापी येत नाही गाजुदीखानानी कागद मागितला तो तर राघो व त्रिंबक मल्हार याजपासी दिल्हा आम्हास दस्तऐवजी गोविंद व त्याजपसली कामे होऊन येत नाही हे काये ते साफ लिहिणे त्यासारिखी मनसुबियाची रचना केली जाईल दामोदरपंतास पाठवणे आथवा रुपयाचा निकाल पडला तरी घेऊन येणे आमचा विचार रोहिल्याकडे जावयाचा आहे नवाबानी तर चमेलीकडील रोख लेहून घेतला आहे रोहिले लबाडीस आले आहेत रुपये हातास आलियावरी साफ नवाबास सागणे की रोहिल्याकडील बाकी उगऊन द्या नाहीतरी आम्हास नावा उतरावयास नाही तरी साफ जागा आम्हास कळेल तेथे उतरून आपले काम करू ऐसे ठीक करणे साराश दिलीतील रुपया तुम्हासारिखे दिलीतील कर्ते व वाकिफगार असून करार केलेले साये वसूल न होत हे आपूर्व आहे जाणिजे छ १० जिल्हेज बहूत काये लिहिणे दामोदरपंतास लौकर पाठवणे [ब.*] लेखन सीमा

---

ले. ३३ } श्री { श. १६७६ पौष
छ १२ } { इ. १७५४ अखेर

पुा राजश्री बापूजीपंत व राजश्री दामोधरपंत स्वामी गोसावी यांसि

विनंती उपरी आमचा आजी छ १२ रोजी गढीवरी आहे उदैक पाटोदीवर होईल तेथून रेवाडी डावी टाकून आहीर मवास आहे त्याचे गावावरी दोनच्यार मुकाम होतील रेवाडीभोवते गांव भरले आहेत त्यास ताकिदीस राऊत देऊन रखवाली करविली आसे आहिराचे गांवास उपद्र[व*] लागला तरी ते कोणी बोभाट लिहितील येथास त्यांचा बोभाट तुम्ही मनास आणणे [नि.*] वरकड ताकीद आहे या उपरी दिलीचे कामकाज लौकर व्हावे हे उतम आहे कोणेविसी वसवास नाही हा पूर्ण भरोसा आसो द्यावा बहूत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंती

---

ले. ३४ } श्री { श. १६७६–७७
} { इ. १७५४–५५

राजश्री बापूजीपत स्वामी गो

पो सखाराम भगवंत सो नमस्कार विनंती उपरी जानानी तसबिराचे आम्हास प्रर्माजन आहे त्यास तुम्ही तसविराचा तलाश करून बहुतच अपूर्व तसबिराचे पुरके दोनच्यार पाठवणे तसविरा उतम चांगल्या जरूर जरूर तलाश करून आम्हासाठी पाठवणे हे विनंती

ले. ३५ } { श. १६७६ पौष वद्य ५
पौष वद्य ५ शुक्र. } { इ. १७५५ जानेवारी ३

श्रीमंत रा। बापूसो। व ता। रा।...सो। रा। नानासो। रा। तात्या...सेवेसी

सेवक धर्मराव तमाची कृतानेक सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल पुष्य वदि ५ सुक्रवार पावेतो स्वामीजीचे कृपाकटाक्षे कुशल असे स्वामियानी स्वकुशळभिविवी लेखन करावयाकारणे आज्ञा केली पाहिजे विशेष येथील वर्तमान तर पूर्वी जवाबी अजुरदारासमागमे सविस्तारेकडून विनंति केली असे त्यावरून विदीत जाहले असेल सांप्रती दिवाण हरगोविंदजी घेऊन भयानिमित्य विठलराव सिंवदेव रा। तात्याचे पुतणे अपा येऊन बेलभंडार सुबेदाराकडून देऊन श्रीजीसी येकांत सपादून गुरुवारी दिवाणजीस घेऊन गेले सरदाराच्या भेटी जाहल्या त्याचा सर्व विस्तार रा। गोविंदरावजीनी स्वामीस विनंति केली असे त्यावरून सर्व अक्षरशा कळू येईल सारांश नवा नवा प्रसंग दर पेश केला असे पाहवे कोणे थरास गोष्ट जाते सात अठपावेतो तर हे हरप्रकारें प्रस्तुत काळी देतील सिवाये करारमदार करून निवाडा करून घेतील येसे दिसते मुळू [ क ] खराब जाहला पैका नाही दिवाणजी सरदारापासून [ माम ]ला चुकऊन अल्यानंतर शहरांत लाहनथोरावर विराड करतील विना विराड यास गत नाही येसे दिसो...या नाही...चा करून ठेविला...[ जया ]जी सिंदे याची पत्रें दर जवाबी लस्करातून अपुलि...अली ते वजिनस सेवेसी पा। असेत पावतीस रसीद पाठवावी हे विनंति

रा। त्रिंबकपंत बाबा स्वामीचे सेवेसी सां। नमस्कार कृपाभिविषी करीत असली पाहिजे हे विनंति

---

ले. ३६ } श्री { श. १६७७ आषाढ शुद्ध १३
सवाल ११ } { इ. १७५५ जुलै २१

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा. * ] श्नां जयाजी सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे यानंतर पत्र पाठविलें तें पावलें लेखनार्थ अवगत जाहाला दरबारचे वर्त... की येथील गुंता उरकल्यानंतर...लेहावा म्हणून तरी सांप्रत हुजरून श्रीमंत साहेबांची आज्ञा दक्षणेकडील स्वारीची आली असे हा विचार दरबारीच(चे) तथ्ये मनास आणून मग याल तरी येणे राजश्री रामराऊ नारायेण पुण्यासच गेले असेत त्यांजवळ सविस्तर अर्थ कळेल त्याप्रों इकडे यावयाचा विचार करणे वरकड कितेक

स्नेहवार्दे उपरोध लिहिला तरी तुम्हां आम्हांत द्वैतता नसे पूर्ववत् जो विचार आहे तोच आहे अंतराये नाहीं रा। छ ११ माहे सवाल [ नि* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ हिंद १।६६ प्रो शि. मो. * ] पो। छ १४ शवाल

---

ले. ३७ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य ५
जिल्काद १७ मंगळ. } पौ छ १६ जिल्काद { इ. १७५५ आगस्ट २६

श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] दादासाहेब स्वामिचे सेवेसी

विनंती आज्ञांकीत येशवंत बाबूराऊ कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता। छ १७ जिल्काद जाणून निजानंदवैभव लिहीत आज्ञा केली पाहिजे विषेश काल सोमवारी दों प्रहरा नजीबरवान फौजसहवर्तमान जलालाबादेस दाखल जाले जामदार वगैर स्वार प्यादे घेतले भेटीसही गेलो होतो सागायाचे ते सागितले ताकीद रखवालीची जाली परंतु रोहले हरामखोर कोठवर कोण निवारण करील आज मंगलवारी कूच होणार होते तो रात्री प्रज्यन्य फार जाला त्यामुले मुकाम जाला आधी तों पाऊसच नवता कुव्याखाले मलाई-किलाई जाली होती ते तमाम रोहले कापून नेतात जामदारी खर्च होतो आणि रखवाली तो कलतच आहे भूत सैन्य रयेतीची नसीब खोटे आधी तो पाऊसच नवता पडला तर आतां की फौजेचा मुकाम जाला जिरायेत कापली जाते केली न केली सारखीच जाली पुढे मेरठेस येणार मार्गांत बेगमाबादपावेतो तो जलालाबादचा प्रगणा पुढे मेरठची हद लागते सिवरामपंत समागमे आहेत सागायाचे सागतात उपाये काये सारांश रयेत धुलीस मिलाली आणि मिलत जाते बहूत काये लिहिणे कृपावृधि केली पाहिजे हे विज्ञापना

---

ले. ३८ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य ९
जिल्काद २२ } { इ. १७५५ आगस्ट ३१

श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] दादासाहेब स्वामिचे सेवेसी

विनंती आज्ञांकित येशवंत बाबूराऊ कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना कीं येथील क्षेम ता। छ २२ जिल्काद जाणून निजानदवैभव कुशलार्थ लिहीत अज्ञा केली पाहिजे विशेष अज्ञापत्र पाठविले ते पाऊन सिरसा वंदिले तरतुदीविशई ताकीदें लिहिले तर मजला तो चाकरीच करणे ज्यात तरतूद आबादी होऊन मुजरा होये तेच करणे मलाई वगैरे जिनस करविली ते जणू नजीबखानास्तव केली होती जाणार त्यास उपाये नाही बीज महर्ग रयतीस सावकार देणारही पाहिजे तथापि आपले श्रम करायाचे करीतच आहे प्रताप माहाराजांचा समर्थ आहे घडोन येईल ते खरे काल स्वारी प्रगण्यात केली

ले. ३५ } श. १६७६ पौष वद्य ५
पौष वद्य ५ शुक्र. } इ. १७५५ जानेवारी ३

श्रीमंत रा॥ बापूसो व ता॥ रा॥...सो रा॥ नानासो रा॥ तात्या...सेवेसी

सेवक धर्मराव तमाजी कृतानेक सा॥ नमस्कार विनंति उपरी येथील कुशळ पुष्य वदि ५ शुक्रवार पावेतो स्वामीजीचे कृपाकटाक्षे कुशल असे स्वामियानी स्वकुशळभिन्निधी लेखन करावयाकारणे आज्ञा केली पाहिजे विशेष येथील वर्तमान तर पूर्वी नबाबी अजुरदारासमागमे सविस्तारेकडून विनंति केली असे त्यावरून विदीत जाहले असेल सांप्रती दिवाण हरगोविंदजी घेऊन भयानिमित्य विठलराव सिवदेव रा॥ तात्याचे पुतणे अपा येऊन बेलमंडार सुबेदाराकडून देऊन श्रीजीसी येकांत सपादून गुरुवारी दिवाणजीस घेऊन गेले सरदाराच्या भेटी जाहल्या त्याचा सर्व विस्तार रा॥ गोविंदरावजीनी स्वामीस विनंति केली असे त्यावरून सर्व अक्षरशा कळू येईल सारांश नवा नवा प्रसंग दर पेश केला असे पाहवे कोणे थरास गोष्ट जाते सात अठपावेतो तर हे हरप्रकारें प्रस्तुत काली देतील सिवाये करारमदार करून निवाडा करून घेतीळ येसे दिसते मुळ [क] खराब जाहला पैका नाही दिवाणजी सरदारापासून [माम]ला चुकऊन अल्यानंतर शहरांत लाहनथोरावर बिराड करतील विना बिराड यास गत नाही येसे दिसो...या नाही...चा करून ठेविला...[जया]जी सिंदे याची पत्रें दर नबाबी लस्करातून अपुलि...अली ते बजिनस सेवेसी पा॥ असेत पावतील रसीद पाठवावी हे विनंति

रा॥ त्रिंबकपंत बाबा स्वामीचे सेवेसी सा॥ नमस्कार कृपाभिनिधी करीत असली पाहिजे हे विनंति

---

ले. ३६ } श्री { श. १६७७ आषाढ शुद्ध १३
सवाल ११ } { इ. १७५५ जुलै २१

राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा. * ] श्रीं जयाजी सिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे यानंतर पत्र पाठविलें तें पावलें लेखनार्थ अवगत जाहाला दरबारचे वर्त... की येथील गुंता उरकल्यानंतर...लेहावा म्हणून तरी सांप्रत हुजरून श्रीमंत साहेबांची आज्ञा दक्षणेकडील स्वारीची आली असे हा विचार दरबारीच(चे) तथ्ये मनास आणून मग याल तरी येणे राजश्री रामराऊ नारायेण पुण्यासच गेले असेत त्यांजवल सविस्तर अर्थ कळेल त्याप्रा॥ इकडे यावयाचा विचार करणे वरकड कितेक

स्नेहवादें उपरोध लिहिला तरी तुम्हां आम्हांत द्वैतता नसे पूर्ववत् जो विचार आहे तोच आहे अंतराये नाहीं रा छ ११ माहे सवाल [ नि* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ हिंद १।६६ प्रो शि. मो. * ] पो छ १४ शवाल

---

ले. ३७ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य ५
जिल्काद १७ मंगळ. } पौ छ १६ जिलकाद { इ. १७५५ आगस्ट २६

श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] दादासाहेब स्वामिचे सेवेसी

विनंती आज्ञांकीत येशवंत बाबूराऊ कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता छ १७ जिलकाद जाणून निजानंदवैभव लिहीत आज्ञा केली पाहिजे विषेश काल सोमवारी दों प्रहरा नजीबखान फौजसहवर्तमान जलालाबादेस दाखल जाले जामदार वगैर स्वार प्यादे घेतले भेटीसही गेलो होतो सांगायाचे ते सांगितले ताकीद रखवालीची जाली परंतु रोहले हरामखोर कोठवर कोण निवारण करील आज मंगलवारी कूच होणार होते तो रात्री प्रज्यन्य फार जाला त्यामुले मुकाम जाला आधी तो पाऊसच नवता कुव्याखाले मलाई-क्लिलाई जाली होती ते तमाम रोहले कापून नेतात जामदारी खर्च होतो आणि रखवाली तो कलतच आहे भूत सैन्य रयेतीची नसीब खोटे आधी तों पाऊसच नवता पडला तर आतां की फौजेचा मुकाम जाला जिरायेत कापली जाते केली न केली सारखीच जाली पुढे मेरठेस येणार मार्गात बेगमाबादपावेतो तो जलालाबादचा प्रगणा पुढे मेरठची हद लागते सिवरामपंत समागमे आहेत सांगायाचे सांगतात उपाये काये सारांश रयेत धुलीस मिलाली आणि मिलत जाते बहूत काये लिहिणे कृपावृधि केली पाहिजे हे विज्ञापना

---

ले. ३८ } श्री { श. १६७७ श्रावण वद्य ९
जिल्काद २२ } { इ. १७५५ आगस्ट ३१

श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] दादासाहेब स्वामिचे सेवेसी

विनंती आज्ञांकित येशवंत बाबूराऊ कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना कीं येथील क्षेम ता छ २२ जिलकाद जाणून निजानदवैभव कुशलार्थ लिहीत अज्ञा केली पाहिजे विशेष अज्ञापत्र पाठविले ते पाऊन सिरसा वंदिले तरतुदीविशई ताकीदें लिहिले तर मजला तो चाकरीच करणे ज्यात तरतूद आबादी होऊन मुजरा होये तेच करणे मलाई वगैरे जिनस करविली ते जणू नजीबखानास्तव केली होती जाणार त्यास उपाये नाही बीज महर्ग रयतीस सावकार देणारही पाहिजे तथापि आपले श्रम करायाचे करीतच आहे प्रताप माहाराजाचा समर्थ आहे घडोन येईल ते खरे काल स्वारी प्रगण्यात केली

खराबी जाली ते ध्यानास आणितो आजही गेलो होतो दिलदिलासा करायाचा तो करितो गोड बोलून समजाऊन सूद उतरे खातरनिशां करितो उतर देतात कीं येकदां कलेल तैसे बीज भोईत टाकले ते धुलीस मिळाले आतां बीज कोण देतो सरकारातून बीज देवणे मेहनत करून लावणी केली जाईल त्यास बीज सरकारांत तो कलतच आहे जाफरखान आले ते घोड्यावर स्वार रुपये मागू लागले जमीदार कानगो गावात जामेदार वगैर बंदोबस्तास फौजत दरवाजियावर हंगामा त्यांत त्यानीही हंगामा केला थोडे रुपये होते दिधले गेले आतां गुलाम नबीखान आले यांचे रुपये देगे त्यास हे सर्व स्वार प्यादे बसले दिकत आहे जमीदार घेऊन बाहेर जावे यांसी येथे जाबसाल कोंणे करावा येथे राहोन तहसील करावी तर बाहेर कोंणे फिरावे हंगाम तो आहे तो सर्वत्र जागा येकचसारखा आतांच स्वारीहून आलो दरवाजियांत येतांच तनखादार मुजाहीम जाले कीं आतांच रुपये देणे फौजेची गडबड नसती जाली तर बायेद्याचे रुये न राहते आतां देणार देतीलच न देऊन चैन कैसे पावतील कालपासून मोकलीक जाली तहसील शुरू केली आणि खातरीही करितो बिजाचा तोटा आहे व जमीदारांवर मोहसल आहे मोहस[ल॰] न करावे तर तनखादारास काये द्यावें प्राणासी गाठ घालितात आबरूवर गोस्ट आली तेव्हा सेवट कलतच आहे बहूत काय लिहिणे कृपावृधी कीजे हे विनंती मौजे बडोडा प्रो जलालाबाद हा गांव बादशाहाचे बायकोस जागीर जाली छंडा व पनासेक प्यादे येऊन बलेतगावी शाहदरियाजवळ आहे बाकी कसरेकम चारासे रुये आहेत दुसरा अमल जाला तेव्हा बाकी येणे कलतच आहे जमीदार मुजरा मागतील याविशई जैसी आज्ञा...

---

ले. ३९ } श्री { श. १६७८ इ. १७५६

राजश्रिया विराजीत राजश्री बाबूराव गोपाळ गोसावी यांसि

सो बापूजी माहादेव व दामोदर माहादेव नमस्कार उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये कुशळ लेखन करणे यानंतर नजीबदौले यानी अपला वकील मेघराज आम्हाकडे पाठविला त्याने ममतेचे भाषणे बहूत केलीं आणि करार केला की तुम्ही आम्ही येका विचारे असावे सरकारच्या दरोबस्त माहालावरून नजीबखानानी हत उचलावा आणि कोन्ही बली हरामी हंगामा करील त्याचे पारपत्य नजीबखानानी आपली फौज पाठऊन करावें येसी त्यानी जाबसाल केली यावर आम्हींही ममतापुरस्कर आस्वासनरूप जाबसाल करून पत्रें त्याजकडें मेघराजाने आपली व आमची पाठविली त्यास शाजापूर व आडा व प्रातापपूर याचाही जाबसाल करून घेतला की तेथेंही ठाणी बसऊन द्यावी त्यास यानी कबूल केलें कीं तुम्हीं येके ग्रहस्तास पाठऊन द्यावें खिलत देऊन जागजागा

ठाणी बसऊन देऊ त्यास तुम्हीं येक भला माणूस त्याजकडे पाठऊन देणे म्हणजे मुला मानासही सिक्षा करून अगर दटाऊन सागून तुमची ठाणी कायम करून देतील तुम्हाकडील ग्रहस्त मात्र जावयाचा विलंब आहे तरी तुमच्या प्रगणियानिमित्य मेघराज वकिलाने नजीबखानास आर्जीही लिहिली ते बजिनस तुम्हाकडे पाठविली आहे तरी हे अर्जी व तुम्हाकडील येक भला माणूस त्याजकडे पाठऊन द्यावा म्हणजे ठाणी हस्तगत सुरळीत बसतील मुला मानाचा कजिया तुटेल तरी पत्रदर्शनी हे काम करावे म्हणजे नजीबखा याजकडे आपला भला माणूस पाठऊन देणे म्हणजे काम होऊन येईल पुढे सिबंदीचेही काम नाही कलले पा। ठाणी कायम जालियावर [नि॰] सिबंदीचे काम नाही सत्वर येक गुमास्ता पाठवणे व तहसील त्यारी करून सरावियासुधा रुये हुजूर पाठवणे अणखी कोणास न देणे बहूत काये लिहिणे हे विनंती

---

ले. ४० } पुर्वणी { श. १६७८ / इ. १७५६

लिहिले की उभयेता सिंदे व रामाजीभाऊ व शमशेर बाहदर व त्याचे दिवाण अत्या अंताजी या सर्वाचा येकीभाव किंवा असलेले इछेनरूप व अंताजी-कडून सर्व हिंदुस्थानचे कार्य घेणार याचा विचार मनास अणून लिहिणे म्हणून लिहिले त्यास तुम्ही जाणतां की श्रीमंत [मो. जा.॰] बावा कैलासवासी हिंदुस्थानाचे राजकारणापासून राहिल्यानंतर मुख्य रघुनाथरावजी असे असताही कोण कोण सरदार येके विचारे राहिले की अता राहतील दुही तर परापर चालत अलीच असे तथापि सरदार ते सरदार सिंदे तर मोहीमकार व बाकी मदतगार मगर शेमशेर धुधीचा गुमान वागवितेत त्यास शेमशेर गाजवितील तर श्वरूपास येतील विना साहस व हातपाये हलविल्यावाचून स्वरूप कलतच असे मुतसदी उभयताचे स्वकार्यी रत आजकालचे सर...जवानसाल करितात तेव्हा मुतसदी कि निमित्य पुढे होतील सिंदे देशास जातील तर सरे फौज सरदार शेमशेरजी अहेतच अकारेकडून सर्व राजकारण घेणार म्हणून लौकिकी वार्ता मात्र असे अकारियाचे स्वरूप तर पाहिले मुसदी तर कामिल न अडलला मगर तीन च्यार हजार [ल॰]स्कराचा सरदार बाजमीयत व साहेब हिमायेत हे तर गोष्ट दिसोन आली कवडीचा मजकूर उमदगी तर कलून चुकली प्रतापावर द्रिष्ट नाही द्रव्यावर आसे व लिहिले की सर्वाचा भावगर्भ मनास अणून लिहिणे त्यास विनाभेट परिचये दुसरियाचा भावगर्भ कोणे रीतीने कलेल मनुर्ष्ये समागमे राहवे मनोगत स्वाधीन करावे तेव्हा भावगर्भ व चितांतील आशये उभये पक्षी शुधतेने कलतो त्यास पूर्वीच श्रीमंती सरदारास उतम प्रकारें पत्रे लिहून व श्रीजीस विनंति लिहून पाठविली असती की फलाण्यास सरदाराकडे पाठविले

खराबी जाली ते ध्यानास आणितो आजही गेलो होतो दिलदिलासा करायाचा तो करितो गोड बोलून समजाऊन मृद उतरे खातरनिशा करितो उतर देतात कीं येकदां कलेल तैसे बीज भोईत टाकले ते धुलीस मिळाले आतां बीज कोण देतो सरकारातून बीज देवणे मेहनत करून लावणी केली जाईल त्यास बीज सरकारांत तो कलतच आहे जाफरखान आले ते घोड्यावर स्वार रुपये मागू लागले जमीदार कानगो गावात जामेदार वगैर बंदोबस्तास फौजत दरवाजियावर हंगामा त्यांत त्यानीही हंगामा केला थोडे रुपये होते दिधले गेले आतां गुलाम नबीखान आले यांचे रुपये देणे त्यास हे सर्व स्वार प्यादे बसले दिकत आहे जमीदार घेऊन बाहेर जावे यांसी येथे जाबसाल कोणे करावा येथे राहोन तहसील करावी तर बाहेर कोणे फिरावे हंगाम तो आहे तो सर्वत्र जागा येकचसारखा आतांच स्वारीहून आलो दरवाजियांत येतांच तनखादार मुजाहीम जाले कीं आतांच रुपये देणे फौजेची गडबड नसती जाली तर वायेद्याचे रुये न राहते आतां देणार देतीलच न देऊन चैन कैसे पावतील काळपासून मोकलीक जाली तहसील शुरू केली आणि खातरीही करितो बिजाचा तोटा आहे व जमीदारांवर मोहसल आहे मोहस[ल*] न करावे तर तनखादारास काये द्यावें प्राणासी गाठ घालितात ब्यावरूवर गोस्ट आली तेंव्हा सेवट कलतच आहे बहूत काय लिहिणे कृपावृधी कीज हे विनती मौजे बसोडा प्रो जलालाबाद हा गांव बादशाहाचे बायकोस जागीर जाली छडा व पनासेक प्यादे येऊन बलेतगावी शाहदरियाजवल आहे बाकी कसरेकम बारासे रुये आहेत दुसरा अमल जाला तेंव्हा बाकी येणे कलतच आहे जमीदार मुजरा मागतील याविशई जैसी आज्ञा...

---

ले. ३९ } श्री { श. १६७८ / इ. १७५६

राजश्रिया विराजीत राजश्री बाबूराव गोपाळ गोसावी यांसि

सो बापूजी माहादेव व दामोदर माहादेव नमस्कार उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये कुशळ लेखन करणे यानंतर नजीबदौले यानी अपला वकील मेघराज आम्हाकडे पाठविला त्याने ममतेचे भाषणे बहूत केलीं आणि करार केला की तुम्ही आम्ही येका विचारे असावे सरकारच्या दरोबस्त माहालावरून नजीबखानानी हत उचलावा आणि कोन्ही बली हरामी हंगामा करील त्याचे पारपत्य नजीबखानानी आपली फौज पाठऊन करावें येसी त्यानी जाबसाल केली यावर आम्हींही ममतापुरस्कर आश्वासनरूप जाबसाल करून पत्रें त्याजकडें मेघराजाने आपली व आमची पाठविली त्यास शाजापूर व आडा व प्रातापपूर याचाही जाबसाल करून घेतला कीं तेथेंही ठाणी बसऊन द्यावी त्यास यानी कबूल केलें कीं तुम्हीं येके महस्तास पाठऊन द्यावें खिलत देऊन जागजागा

ठाणी बसऊन देऊ त्यास तुम्हीं येक भला माणूस त्याजकडे पाठऊन देणे म्हणजे मुला मानासही सिक्षा करून अगर दटाऊन सागून तुमची ठाणी कायम करून देतील तुम्हाकडील ग्रहस्त मात्र जावयाचा विलंब आहे तरी तुमच्या प्रगणियानिमित्य मेघराज वकिलाने नजीबखानास आर्जीही लिहिली ते बजिनस तुम्हाकडे पाठविली आहे तरी हे अर्जी व तुम्हाकडील येक भला माणूस त्याजकडे पाठऊन द्यावा म्हणजे ठाणी हस्तगत सुरळीत बसतील मुला मानाचा कजिया तुटेल तरी पत्रदर्शनी हे काम करावे म्हणजे नजीबखा याजकडे आपला भला माणूस पाठऊन देणे म्हणजे काम होऊन येईल पुढे सिबंदीचेही काम नाही कलले पा। ठाणी कायम जालियावर [नि॰] सिबंदीचे काम नाही सत्वर येक गुमास्ता पाठवणे व तहसील ज्यारी करून खरावियासुधा रुये हजूर पाठवणे अणखी कोणास न देणे बहूत काये लिहिणे हे विनंती

---

ले. ४० } पुर्वणी { श. १६७८ इ. १७५६

लिहिले की उभयेता सिंदे व रामाजीभाऊ व शमशेर बाहदर व त्याचे दिवाण अत्या अंताजी या सर्वांचा येकीभाव किंवा अपलेले इछेनरूप व अंताजीकडून सर्व हिंदुस्थानचे कार्य घेणार याचा विचार मनास अणून लिहिणे म्हणून लिहिले त्यास तुम्ही जाणतां की श्रीमंत [मो. जा.॰] बावा कैलासवासी हिंदुस्थानाचे राजकारणापासून राहिल्यानंतर मुख्य रघुनाथरावजी अले असताही कोण कोण सरदार येके विचारे राहिले की अता राहतील दुही तर परापर चालत अलीच असे तथापि सरदार ते सरदार सिंदे तर मोहीमकार व बाकी मदतगार मगर शेमशेर धुधीचा गुमान वागवितेत त्यास शेमशेर गाजवितील तर अरूपास येतील विना साहस व हातपाये हलविल्यावाचून स्वरूप कलतच असे मुतसदी उभयताचे स्वकार्यी रत आजकालचे खर...जवानसाल करितात तेंव्हा मुतसदी किं निमित्य पुढे होतील सिंदे देशास जातील तर खरे फौज सरदार शेमशेरजी अहेतच अकारेकडून सर्व राजकारण घेणार म्हणून लौकिकी वार्ता मात्र असे अकारियाचे स्वरूप तर पाहिले मुसदी तर कामिल न अडलला मगर तीन च्यार हजार [ल॰]स्कराचा सरदार बाजमीयत व साहेब हिमायेत हे तर गोष्ट दिसोन आली कवडीचा मजकूर उमदगी तर कळून चुकली प्रतापावर द्रिष्ट नाही द्रव्यावर आसे व लिहिले की सर्वांचा भावगर्भ मनास अणून लिहिणे त्यास विनाभेट परिचये दुसरियाचा भावगर्भ कोणे रीतीने कलेल मनुर्ष्ये समागमे राहवे मनोगत स्वाधीन करावे तेंव्हा भावगर्भ व चितांतील आशये उभये पक्षी शुधतेने कलतो त्यास पूर्वीच श्रीमंती सरदारास उतम प्रकारें पत्रे लिहून व श्रीजीस विनंति लिहून पाठविली असती की फलाण्यास सरदाराकडे पाठविले

असे त्यास अनायासें सर्व योग व मजलिसगर्मी संपादून मार्ग रक्षिला असता अता लिहिलिया कैसे जनतें व पूर्वी विनंतीही म्या केली होती कीं शामिलफौज कोणी न कोणी सरदारानी असावे जर शामिलफौज चौघां सरदारातून येक जण असते तर दुसरा कोणे प्रकारे पाये ठेविता रिकामी जागा पाहून हर कोणी सिरोपरयाही टोक इछतो अताही काही गेले नाही लवकर शामिलफौज होत व हजूरची मजबूती सर्व प्रकारे रक्षिल्या काय तात्र आसे कीं कोणीं कदमदराजी करील श्रीमंत रघुनाथरावजी व सुबेदारासारिखे कुमेरचे डेरियावर असता विपरीत विचरिले तेव्हा पेश न गेले ते अतां कोणे प्रकारे चालील सुधुकी सरदारांची हसील व नुकसान मामलतेंत पडेल मुख्य गोष्ट तर हे की बादशाह व वजीर यांची मरजी अपले हाती ठेवल्या सर्व काही उत्तम असे अपला व हरगोविंदजीचा प्रकार नसावा पाण्यात राहून माश्यासी वैर न करावे लिहिले की जवाहर हस्तगत करून लवकरीच येतो त्यास लवकर शामि[ल॥] फौज होणेच सलाह अहे बहूत काये लिा तुम्ही अपणाकडून सिष्टाचारपत्रें हरिहरास व जगनाथ साहेब व सिवनाथ संभुनाथजीस व सदाशिवभटजी अदीकरून जे कोणी तुमचे स्नेहीत असतील त्यास सिष्टाचाराची देच कीं वैकुण्टवासीं माधारें त्याचा पुत्राचा सांभाल उतम प्रकारें केला व अताही करणार तुम्ही अहा स्नेहिताचा धर्म तर हाच की संकटी कार्ये करित्यास सर्व प्रकारें रावजी माघारे त्याचा सांभाल कराल व पत्रद्वारे स्नेहाधिकता वाढवाल भगवान कृपेने लवकरीच भेटू व रा॥ घनेश्वरजींनी बहूत करून परमसंकटी साहेता केली व दुसरे रामकृष्ण मुनशीजींनी अति गौर केली या उभयतास बहूत शुक्रगुजारी लिहिणे व सलाह तर हेही असे कीं श्रीमंतांची पत्रे स्नेहभावे इशारातरिकयेत जरूर पत्रे श्रीमंताची व तुमची पाठवाल पोटात निघून कार्ये केले पाहिजे या प्रकारचा समये अला अहे बहूत काये लिा कृपा लोभ असो दीजे हे विनंति

---

| | | |
|---|---|---|
| ले. ४१<br>जिल्काद २६ | श्री वरद | श. १६८० आषाढ वद्य १३<br>इ. १७५८ आगस्ट १ |

राजश्रिया विराजित राजश्री रघुनाथ नाईक स्वामीचे सेवेसी

सो॥ बापूजी माहदेव पुरुषोतम माहादेव सां॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल छ २६ जिलकाद जाणून तुम्ही आपले कुशल हर घडी लिहीत आसिलें पाहिजे विशेष बहूत दिवस जाले तुम्हाकडोन पत्र येऊन वर्तमान कलत नाही तर आलिया माणसासमागमे पत्र पा॥ संतोशवीत असिले पाहिजे विशेष इकडील वर्तमान रा॥ घोडाजी ना॥ यानी लिहिले अहे त्यावरून स[वि]स्तर वर्तमान कलेल राजश्री आंताजी माणकेश्वर या... हवाली माघात काल शा देणे त्याची वरात राजश्री जनार्दन बाजीराव याची महिन्या १ चे वाइद्याची केली अहे हा।

अशाढ वद्य १३ पासून श्रावण वद्य १३ परियेंत वरातचा वाइदा अहे त्यासी चिरजीव रा॥ तात्यास लि॥ आहे ते तुम्हास विनंती करतील ते मान्य करून कार्य करणे जे गोस्टीने पत राहे अणि जेघन्य न होये ते करावें सर्व भरवसा तुमचा अहे आम्हींही श्रीमंता समागमे सत्वरींच त्या प्रांतास येतों श्रीमंत राजश्री दादासाहेबीही कृपा करून चिरजीव रा॥ नानास जनकोजी सिंदे याजसमागमे माघारा पां॥ चिरंजीव गणपतराऊ व रा॥ त्रिंबकपंत यासी दिलीस रा॥ केले त्याजमुळे पुढे उमेदवारीसी दिसोन येती राजश्री जनकोजी सिंदे यानीही कितेक मायावादाची भाशेणे करून चिरंजीवास समागमे नेले सर्वप्रां॥ भरवसा तुमचा जाणून लिहिले असे कोणे गोस्टीची [ चिंता ] न करणे ईश्वर सर्व उतम करील [नि॰] हरप्रकारें क[रून] रा॥ तनखेदारास पावेत ते करणे तुमचे भरवसियावर अहो भेट होये तो सुदिन हे विनंति

रा॥ आत्मारामजीस नमस्कार लि॥ परिसोन लोभ असो देणे हे विनति

---

| | | |
|---|---|---|
| ले. ४२ | २<br>सुमार | श. १६८१ माघ शुद्ध १५<br>इ. १७६० फेब्रुवारी १ |

ईश्वरें मोठी खैर केली सर्वांबराबर सर्वस्व...दों प्रहरास येऊन पळत पळत पाटोदीस बा...वीस कोस आले तेथून तेच समई पांच घटका रात्र...डेरे दांडे तंबू कनात पालपेंढतल मुतबख खजाना...खाना सर्व सोडून पळाले ते रातोरात गुरुवारची व सारा दिवस शुक्रुरवारचा वाट चालत मांडण म्हणून जागा आहे जाटाची तेथें आले तेथें रात्र क्रमून शनवारी रविवारी सोमवारी लांब लांब मजला करीत कोटपुतलीजवळ पावले तो जैनगराकडून रा॥ मल्हारजी होलकरही आले त्यांच्या यांच्या भेटी जाल्या यांची व यांच्या फौजेची अवस्था पाहून तेही [सर्द] जाले सोमवारीं मगळवारीं विचार करून दोघां...नी बहिरा करोलीकडे मार्गस्थ केल्या ते समई...[अ]त्याग्रह करून नानासाहेबांस बाहेर बार घेऊन निघा[ले]...पासि आलो तेथून डीग बारा कोस होती बाही[र]... कडे गेली आम्हीं व नानासाहेब डिगेस आलों श्रीमंत ग[णप]तरावजी आम्हां आगोधर डिगेस आले होते त्यांची व आम्हा उभयेथाच्या भेटी जाल्या आतां त्रिवर्ग येके ठाईच डिगेत आहो वजीर नागरमल दिलवालीसिंग वगैरे सर्व कबिल्यासुधां येथेंच आहेत जोंवर बुणगे चमल उतरून जाये तोंवर सरदार कोटपुतलीजवळ सड्या फौजेनसीं मुकाम करून राहिले होते इतक्या दिवसांत आबदालीने दिली लुटून कतल करून करोडोंचीच लूट मेळऊन फौजबंदी करून नीट सरदारांवर चालला हे वर्तमान सरदारांनी आइकून कृष्णगडावरून जाटाच्या मुलकांत आले सत्रा कोस डीग राहे तेथवर पावले जाटाने सर्वां...ची व रफाकतीची

अंगेजनी केली तों आबदाली हे वर्त[मान आय]कून पंधा कोशांवर यांच्या मुक्कामत्यावर आला यांच्याने तग न धरवे मग जा...पाहाडांत गेले तिकडेही आबदाली...छून आणरवीकडे जातील यांच्याने त्याजसमोर येववत...स्वार प्यादा रोहिले आबदाली मिळून आशी हजार आहे...यापाशि आठ दाहा हजार फौज राहिली आहे ते जशी...नाहीं वेताशारखी कांपते वीस हजार फौज म्हणायाची होलकरापाशि आहे त्यांत सात आठ हजार चांगली आसेल तिने परम हबायत खाल्ली आहे आबदालीच्या तोंडावर कोणी धुरत करून जाईलसे दिसत नाहीं व जिकडे हे पळतात त्याच रोखें तोही येतो त्याची धून तो येसी आहे कीं चमलेपार यांस पिटून आपण व माधोसिंग व आयांधेकर व जाट येकत्र होऊन उजेनीपर्येत यावें येसें वहवहे...हेत ईश्वर यांचे मुख श्याम करो नानासाहेबाची...बरो जाली पहिल्यासारखे वागतात चिंता न करणे...वर्ग डिगेंत गोशा कुशल जाणून बसलो आहों येथलें...आडागडा आहे सर्व वर्तमानही कळतें धण्याची चा[करीवर] हाजर आहों चिंता न करणे इतकें आबदाल्याचे पुरा...ळे पहिले स्वामिचे खास दस्तक तीन बंद आले व (व) नानासाहेबांचेही पत्र पहिले व आतांचे आवलोकन केले सर्व ध्यानास आले याचा जाब सविस्तर मजला लिहिणे सलाह नाहीं व स्वामिनीही सविस्तर उतराची अपेक्षा न करावी तुम्हीं तर भाऊ आबा पुत्रही हे घरबूड आइकून जवळ उभा राहणार नाहीं हे मामलत कोण्हाच्याही चितास न आली तुम्ही तों येकदां सांगितले आसेल लिहिणारानी पंचवीसदां पंचवीस पंचवीस बंद लिहिले व मना केले आवतारांची बोली होत होती त्यास वर्ष जाले तेंव्हांपासून मना केले...घातल्या नाइकिले सेवट हे गोष्ट बहुधा ईश्वरास न मानली त्याने येसी कला केली कीं वाळांतीणच गेली न...आबदालीने मेरठ वगैरे सारा मुलूक सिकंदऱ्या[पावेतो] जप्त केला ठाणी बसविली सहजच...

---

| | | |
|---|---|---|
| ले. ४३<br>पौ रमजान ८ | श्रीगजानन | श. १६८३ चैत्र शुद्ध १०<br>इ. १७६१ एप्रिल १४ |

पौ छ ८ माहे रमजान दो प्रहरा

तीर्थस्वरूप राजश्री बापूसाहेब व नानासाहेब वडिलांचे सवेसी

विज्ञापना येथील वर्तमान श्रीमंत स्वामीनी विचार केला आहे की श्रीमंत राजश्री दादासाहेब व बाबूजी नाईक विसेक हजार फौजेनसी बऱ्हाणपुरापर्येत जावे हिंदुस्थानावर दबाव द्यावा पुढे राजश्री नारो शंकर वगैर तीस हजार फौजा जातील बंदोबस्त तिकडील होये तोवर महिना पंधरा दिवस तेथेच नरमदे आलीकडे आसावे उपरांतीक गुजरातेवर दबाव द्यावे व दमाजीपासून कांहीं रुपया घ्यावा हे ठेराविले आहे व समागमे त्रिंबकराव मामा कारभारी परतु बाबूजी नाईक

ठवले आहे तिश लक्षाचा सरंजाम मागतात त्यांची समजोती करणार व श्रीमंत पंत प्रधान व दाहावारा हजार फौज व बाबूराव फडणीस कारभारी असे सातान्या-कडे जाऊन तिकडील राज्याचा वगैरे बंदोबस्त करून कृष्णातीरी महिना दोन महिने राहाणार येथे आठ दाहा मुकाम करून सर्व सरदाराच्या समजाविसी करून याप्रमाणे करणार श्रुत होये राजश्री जनकोजी सिंदे याचे वर्तमानाविषई पूर्वी विनंती लिहिली आहे त्यास जरूर जरूर साकल्य वर्तमान लिहिले पाहिजे हैगई सहसा न करावी वरकड वर्तमान येथास्तीत आसे श्रुत होये चरणदरशनाची इछा आहोरनिसी लागली आहे दरशनलाभ होये तो सुदीन कृपा केली पाहिजे हे विज्ञापना

चिरंजीव राजश्री गणपतरावजी यासी अनेक आशीर्वाद तुम्ही स्वदस्तूर पत्र कधी न पाठवा हें गोष्ट उचीत नाही सर्वांचा जीव तुम्हचेपासी लागला आहे तर हस्ताक्षरपत्र पाठवायास आलस न करणे व सत्वर भेटीस येणे बहूत काये लिहिणे हे, अनेक आसीर्वाद

वेदमूर्ती घोंडा दिक्षीत स्वामीस सां नमस्कार कृपा लोभ कीजे हे विनंती

राजश्री बाळोबा स्वामीस सां नमस्कार सदोदीत हस्ताक्षरपत्र पाठऊन संतोषवीत जाणे तीर्थस्वरूपजीसहवर्तमान सत्वर येणे भेट होये तो सुदीन हे विनंती

राजश्री वैजोपंत व सर्व मंडलीस सां नमस्कार

---

| | | |
|---|---|---|
| ले. ४४<br>पौ जिल्हेज १९ | श्री मोरया | श. १६८३ आषाढ वद्य ५<br>इ. १७६१ जुलै २२ |

पैवस्तगी छ १९ जिल्हेज मा नगो मिर्घा

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री पुरुषोतमपंत स्वामीचे शेवेसी

पो गंगाधर येशवंत व चिंतो कृष्ण सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जावें तुम्ही पहिले पत्र छ १० जिल्हेजचें व जीनत माहालचे पत्र व याकूबआलीखानाचे पत्र व सैफुदी मा याचे पत्रे पाठविलीं ते पाऊन आक्षरशाहा वाचून लेखनार्थ आवगत जाहाला व मागून छ १३ जिल्हेजचे पत्र व नजीबखानाचे पत्र पाठविलें तेही प्रविष्ट जाले यैसियासी जीनत माहाल व नजीबखान व याकूबआलीखान याजला येकत्र करून सर्व गोष्टी पक्या केल्या आणि त्याची यावयाविसी पत्रें घेऊन पाठविली आहेत तर आथःपर टाळाटाळ न करितां जलद यावे न आलेस तर काम सर्व बंद होतील पातशाहा सुज्यातदौले येणार मग हे मज्यालग रंग राहाणार नाहीं मग कामास जड पडल समये जाणून लिहिले आसे ठाकराचे सलुखाचे काम आपले हते करून घ्यावें त्याचे बोलावयाचे प्रकारे बोलून रूपरामास घ्या आणावे त्याचे काम करावे

आपले काम करून घ्यावे आमची चाकरी पाहावी हैगई न करावी म्हणून वार-
वार खोळून लिहिले यैसियासी तुम्ही येथें होतेस तेव्हांच आमचे लक्ष मरजी
तुम्हास विदीत आहे आलीगौरासिवाये काहीमात्र दुसरें जाणत नाहीं यास्तव
ठाकरास देखील साफ उतर दिल्हे होतें त्याच गोष्टीवर आम्ही कायेम आहों येथें
हिदुस्थानी जमीदारी कारभारामुले उलगडा न जाला गाजुदीखानाने पारचे रोहि-
ल्याचा वगैरें भेदेकरून आमचे आमलांत खलेल केले आणीक कितेक बदसलूख
जाले सर्व नुकसानी सोसून येक लक्ष पातशाही राखिलें तेच बलाऊन चाकरी
करून दाखवावी लोभ संपादून घ्यावा खावंदानी पातशाहा केले ते आम्हास दक्षणी-

श्री
राजश्री पुरुषोतमपंत स्वामीस

मात्रास मान्य आहे त्याजपासी हजर होऊन आपले कामकाज करून
घ्यावें यापेक्षा विशेष काये टालाटाल किमर्थ करावी बादशाहा प्रयागास आले
सत्वर येणार उतमच आहें श्रीकृपेने सर्व फितूर तुटतील आपली गोष्टी मात
पकी जालिया आम्ही यावे याप्रमाणे तुम्हास लिहीत गेलो प्रस्तुत तुम्ही पत्रे पाठ-
विली त्यांत भाव की भेटीस येणे येथे आलिया तुमचे कामकाजाचा सर्व बदोबस्त
होईल त्यास नजीबखान व गैरेयाची पत्रे याप्रमाणें सर्वदा येतात परंतु आमचे
कामकाजाची काहीं शकल बाधून किंचित परिचीत यावी ततःक्षणी आम्ही कूच
करून यावें मग सर्व कार्यभाग बदोबस्त व्हावा येणेप्रा जालिया पूर्ण भर्वसा पुरतों
हे गोष्टी आपले घरातील विचार आहे सिष्टाऱ्याराची पत्रें येत गेलीं सांप्रत
राजश्री गोविंदराव व रा बापूजी त्रिंबक येथून पाठविले आहेत त्याजपासी
सविस्तरे सांगितले आहे ते तुम्ही येकत्र होऊन आपल्या कार्याची शकल काढून
काही परिचीत आम्हास ये यैसी होऊन तुमची त्याची पत्रे आली म्हणजे आम्ही
स्वार होऊन येतो दुसरा कोणेविसी आटकाव राहिला नाहीं त्याचे पत्राची उतरें
पाठविली आहेत ते पावतील ज्याची त्यासि पत्रे देऊन आपली कामे करून
घ्यावया १ व १ चीं रीत काढून कार्यभाग सत्वर होये ते करणे तुम्हीं पत्रे पाठविली याज-
वरच आम्ही यावें कोणेविसी संदह न करावा परंतु हे दिली आहे सुरलीत कामास
दिकती पडून दिवसगत लागती साप्रतचा प्रकार तर विलक्षण जाला आहे याजकरि...

---

ले. ४५ | २ | श. १६८३ आषाढ–मार्गशीर्ष<br>इ. १७६१ जुलै–डिसेंबर

इंद्रप्रस्थीं नवाब शाहावलीखान याचे नावे खलिता व आमचे नावे पत्र
व याकूबआलीखानाच्या नावे खलिता आला त्यात हेच लिहिले की याकूब

[आ*]लीखान यांही बहूत बहूत स्नेहाविशई लिहिले त्यास आम्ही खलकची रफायेत व्याहातो आमच्या पत्री अश्रफुलउजरा शाहावलीखानाची बहूत तारीफ लिहिली जे याजला बहूत मायेत ठेवणे हे आज्ञा पावली दुसरे [सुजा[उदौला व] आलीगोहर व आंबेरचा राजा वगैरे...याच निक्षेप स्वामीनी पुढे फौजा र[वाना के]ल्या नर्मदा उतरून घ्यावी उजनपर्यंत चालून घ्यावे या गोष्टीसाठीं पेशकसीचे पैशची सरकारात निशा करू त्यास स्वामीच्या प्रतापे व येका नवाब वजीर शाहावलीखानाच्या खलित्यावरून व दिवाण गुलराज श्रीमंत राजश्री [मो. जा.*] नानासाहेब कैलासवासी या जवळून आले त्या वचनावर नजर देऊन तिलतुल्य आंतार न केले व आमच्या विनंतीप्रमाणे सर्वांस हिंदुस्थानियांस व दक्षणेच्या सुभेदारपर्यंत सर्वांस रकमा फर्मान व अश्रफुलउजराचे तालीकचे व हसबुलहुकूम पाठविले जे श्रीमंत राजश्री कैलासवाशी बालाजीराव याचा भाऊ रघुनाथराव तो माझा भाऊ व श्रीमत राजश्री माधवराव पंतप्रधान मजला तईमूरशाहाप्रमाणे आहेत जो कोण्ही त्यासी अंतर करील त्याजवर गजब सुलतानी होईल याप्रमाणे लिहिलें व बोलतात सेवक स्वामीकार्यावाचून दुसरी गोष्ट जाणतच नाही आणि पुढेही श्रीकृपेकरून अंतर होणार नाही श्रीमंत पंतप्रधानाचे नावे टिकाइती... वस्त्रे जवाहीर वगैरे ज्याप्रमाणे हिंदुस्थान...प्रमाणे सरफराजी करून...पूर्वक जे तुमच्या...पर्यंत जो कोणी तुमचा शत्रू तो आमचा शत्रू याप्रमाणे...अश्रफुल-उजरा घेऊन दिवाण गुलराज याजला समागमे देऊन चिरंजीव राजश्री पुरुषोतम माहादेव यासी सेवेसी पाठविले आहेत हा तरतूद न आम्ही केला न आणखी कोणी केला हा श्रीचे प्रतापे जाला की श्रीमंत नानासाहेब कैलासवासी दोन गोष्टी याच्या माणसाशी अैशा बोलून गेले जे पातशाहा वजीर अश्रफुलउजरा स्वामीसी तिलतुल्य अंतर ठेवीत नाहीत चिरंजीव रा पुरुषोतम माहादेव व दिवाण गुलराज हे विनंती करितील ज्याप्रमाणे श्रीमंत राजश्री नानासाहेब कैलासवासी बोलून गेले आहेत त्याप्रमाणे याची तसली केलिया दिलीपर्यंत मेरठ वगैरे प्रांत स्वामींचा बेखलश कायेम होईल बेखलश आम्हास शाहानशाहानी व अश्रफुल-उजरा याणी तफजूल करून हजुरामधेच ठेविले आम्ही स्वासीकार्याकरिता येथे राहिलो असो श्रीमंत साहेब कैलासवासी दोन गोष्टी बोलून गेले आ...वचनात अं[तर] न पडे...ची आ...करणा...समर्थ आहेत ज्याप्रमाणे अलीगोहर जवाबख्त फर्मानवाडी उभी करून शाहानशाहाच्या ताजबक्षीची इनायेत घेतात त्याप्रमाणे स्वामी घेणार समर्थ आहेत हत्ती घोडे राजश्री मल्हारबा व सिंदे पाठवितील म्हणोन आज्ञा त्यास तूर्त याजकडूनच घेऊन स्वामीसेवा केली पुढे चिरंजीव सेवेसी पावलियावर हजुरीहून समागमे हत्ती वस्त्रे वगैरे देऊन रवाना करणार स्वामी समर्थ आहेत विनंतीपत्रे तर येथून वरचेवर जातात स्वामीनी लिहिले जे पत्राचा तुम्हाकडून अभाव त्यास येकदोन जोडिया फिरोन आल्या येकदोन रजपुताणियात मारल्या गेल्या दोनतीन जोडिया बुऱ्हाणपुरांत केल्यां

याजमुले अंतर पडले याउपर जे वृत होईल ते वरचेवर विनंती लिहून पाठऊ सेवेसी श्रृत होये

---

ले. ४६ } श्रीवरद { श. १६८३ माघ वद्य ५
रजब १८ } { इ. १७६२ फेब्रुवारी १३

श्रियासह चिरंजीव राजश्री तात्या यांसि प्रती बापूजी माहादेव व पुरुषोतम माहादेव आर्शीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ १८ रजब मा। इंद्रप्रस्थ जाणून स्वकीय लेखन करीत गेले पा। विशेष बहूत दिवस जाले तुम्हाकडील वर्तमान कलत नवते म्हणौन चित उद्वीग्न होते तो इतकियात तुमची पत्रे श्रीगोद्याचे जवळील मुकामीची आली त्यावरून विस्तारे वृत कलले श्रीने मोठे आरिष्ट दूर केले बहूत आनंद जाला तो पत्री कोठवर ल्याहावा श्रीमाहालक्ष्मीने कृपा केली आपल्यास रक्षक ते श्रीच आहे तुमचे पत्र भाद्रपद मासापासून आले नवते ते हेच पत्र मागेस्वर शुध १५ पौर्णिमेचे आले ते येथे छ १२ रजब मुकाम मजकुरी पावले सविस्तर वृत ध्यानास आले श्रीमंत स्वामीस श्री येश देऊन दक्षणचा बंदोबस्त होऊन हिंदुस्तानात येऊन शत्रू पादाक्रांत होऊन बंदोबस्त होये हेच आम्ही श्रीपासी मागतो याच तारखेस श्रीमंताची पत्र आली तेही वाचून आनंद जाला इकडील वृत वरचेवर आठा दिवसाचे आंतराने पत्रे पाठवीत आसतो परतु हंगाम्यामुले पावत नाही मार्गी हिला हरकत मोठी वाट चालत नाही म्हणौन पावत नाही बरें आसो राजकी वर्तमान आली गोहर पातशाह व शुज्यातदौला कालपीचे मैदानात आहेत झासीचे किल्यासी युध्य होत आहे मोट वगैरे किले दोन शुज्यातदौलानी घेतले फौज दाहा पंधरा हजार आहे श्रीमंताच्या मुलकासी खलस आगोधर केला आता खिसाने जाले आहेत पातशाहची अवस्था पाहावी तर फौज थोडीबहूत होती ते उठोन गेली आता च्यार पाचसे स्वार आहेत तेही उपासी मरतात पातशाहस भक्षावयास दुवख्त्या शुज्यातदौला देतात या प्रकारचे वृत तेथील आसे ठाकूर सुरजमल यानी आगरियाचे किल्यांत जाऊन तमाम किला दुधाने धुऊन किल्यात मसीद व कबरा होत्या त्या पाडून बाहीर टाकिल्या वास्तुशांत करून पातशाहचे ठिकाण बसावयाचे संगमरवरी होते त्याजवर तलाख लिहिली होती की पातशासिवाये कोणी न बसे त्याजवर ठाकूर आपण बसले किल्याची व शहराची बंदोबस्ती करून फौजेसुधा श्री मथुरेस येऊन लग्न केले जवाहीरसि

[पत्राच्या आरंभीं* ] आसीर्वाद श्रीने तुमचे आरिस्ट टाळिलें याचा शुक्र श्रीजवळ किती म्हणून करावा लोभ असो दीजे हे असीर्वाद

---

ले. ४९
[रमजान १] ३ नंतर

श. १६८४ चैत्र १५
इ. १७६२ एप्रिल ९

......जानचें आलें ते छ १३ माहे मारीं पावोन चित परमहर्षयुक्त जालें शाहा अबदालीची मुलाजमत होऊन बहूत कृपा संपादोन जे जे भाषणें शाहाची व अमात्याची होऊन अलीगोहर शुजाउदौला नजीबखां माधोसिंग जाट यांची पत्रें गेली त्याची प्रतिउतरें वकिलांस प्राप्त जालीं त्या पत्राचा भावार्थ आम्हास कळावा याजकरितां तपसिलें लिहिलें तें सर्व ध्यानास आलें ईश्वर वडिलांस सलामत राखो या दिवसांत अश्या आफतीमधें स्वामीकार्यावर द्रिष्टि देऊन तेथें जाऊन स्वामीकार्यें केली वडील मोठे प्रारब्धवान आहेत येश घेतलें व घेतील बंधोबस्त होऊन येईल इकडील वर्तमान तर श्रीमंत [मो. जा. *] स्वामींनी निजामअलीस पराभवातें पावोन हिंदुस्थानांत रा नारो शंकर यांस विसा हजारा फौजेनसीं मार्गस्त करून आपण करणाट[क*] प्रांतीं जावयाचा योग केला त्यास चालते समई श्रीमंताचे चितांत कल्पना आली कीं सिंद्याची सरदारी मातबर मऱ्हाठ्यासिवाय सरदारीचा चक बसणार नाही माहादजी सिंद्यास सरदारी...... कारभार नारो शंकर करतील हा निरधार......पतास पाचारून सांगितले या... केलें कीं हाच प्रसंग करणें होता तरं मजला हें काम कश्यास सांगितलें चालिसा लक्षाचा कर्जदार जालों याची वाट करून द्यावी पुढें ज्यास काम सांगणें त्याजला सांगावें त्यास अश्या समयांत रुपयाचा मार्ग होतो व कोण करितो याजकरितां माहादजी सिंद्यास मवकूफ करून पंत मारनिलेची रवानगी केली तीन मजली सिद्धटेकाहून अलीकडे येऊन काये संशये नारोपंतास प्राप्त जाला हे न कले घरचे ग्रहस्तासीं विचार करून श्रीमंताकडे रा अच्युतराव गणेश पाठऊन रा माहादजी सिंद्यास सरदारीची वस्त्रें देविली आपण पुढें मलगांवास आलें दोन तीन दिवस होते तों वर्तमान आलें कीं राजश्री मल्हारजी होलकर हिंदुस्थान प्रांतीहून आले ते मजल दरमजल श्री [मो. जा.*] जेजूरीस मार्तंडजीच्या दर्शनास जातात हें येकोन भेटीस सडे गेले भेटी गोष्टी संवछर कोकमठाणी जाल्या तेथून रुकसत होऊन मलगांवास आलें तों माहादजी सिंदेही तेथेंच येऊन पावले त्यांजला दोन...सामोरा जाऊन घेऊन येऊन दुसरे दि...फत करून वस्त्रें भूषणें हाती सिर...तीन प्रहर रात्रपर्यंत येकांत होऊन वचनप्रमाण उभयपक्षीं जालें तीन मजली समागमें गेलें सिंद्याच्या घरचा प्रकार व श्रीमंताच्या घरचा येकच धारा यांचा आलीज्याहा कारभार तेथें यांची स्थित व स्वरूप राहणें कलतच आहे अश्या दूरंदेशीवर द्रिष्टी देऊन फौज ठाकून सिंद्याच्या समागमे देऊन आपण आपल्या घरपागेसहीत मलगांवास आले ते हा कालवर तेथेच आहेत बहुधा सुभेदारानी कांही बोध केला हे नकले पुढें काये मनसबा करतील जो निदर्शनास येईल तो खरा रा माहादजी सिंदे मजल [दर] मजल जाऊन बऱ्हाणपूरचा सुभेदार हस्तगत करून ठाणें श्रीमंत [मो. जा.*] स्वामीचे बसऊन उजेनीस

जाऊन मुकामात करून राहिले आहेत दुसरें श्रीमंत राजश्री [मो. जा.*] पंत प्रधान व श्रीमंत राजश्री [मो. जा.*] दादासाहेब हे उभयथा फौजेसहीत सिद्धटेंकाहून पांच सात मजली करणाटक प्रांतीच्या रोखें जाऊन रा गोपालराव गोविंदराव व रा मल्हारराऊ रा...वगैरे सरदार पंचवीस तीस हजारा स्वारा... करावें हे मानस होतें परंतु त्या प्रा...चागले हे विशेषात्कारे जाग जा...तात जे निदर्शनास येईल तें या...सेवेसी लिहून पाटऊं श्रीमत राज [श्री पं]त प्रधान व राजश्री त्रिंबकराव मामा पुणियास आलियावर श्रीमंत राजश्री [मो. जा.*] दादासाहेब व राजश्री मल्हारजी होलकर सर्व मंडली येकत्र जालियावर पाहावे काये मनसबा होईल श्रीमत [मो. जा.*] दादासाहेबास पुणियास येऊन दीढ महिना जाला राजश्री बाबूराव फडणीस जवल कारभारी आहेत श्रीमत आहिरनिशी श्रानसंधेत मग्न आसतात सर्व कारभाराचा येख्तियार राजश्री बाबूरायांवर आहें रावजीही बहुतेक आयेषआरामातच आस्तात मातबर कारभार विना श्रीमत राजश्री [मो. जा.*] पंत प्रधान पुणियास आलिया व्यतरिक्त त्रिंबकरावमामा आल्यासिवाये होत नाही ते हे येकत्र जालियावर पाहावे काये मनसबा होतो राजश्री सखारामपंत बापू सासवडीं आहेत घरी श्रानसध्या करीत बसले आहेत जेष्ट श्री...चे मानस की बापू कारभारी आसावे व त्यांचे मत्ते कारभार व्हावा हेच मानस राजश्री मल्हारजी होलकराचे व गंगाधरपंत तात्याचें आहे श्रीमत [मो. जा.*] पंतप्रधान स्वामी व सर्व कारभारी मडली व मातुश्री गोपिकाबाई-साहेब सर्वांचे मानस व मोठा आग्रह की काही आसो सखारामपंतास घरीच बसवावें त्यास सर्वांचे चित की राजश्री त्रिंबकराव मामानी कारभार करावा याप्रकारे त्यास तुर्त सर्व येख्तियार त्रिंबकराव मामाचा आहे व कारभारही उतमच केले कर्नाटक प्रांती श्रीमंत [मो. जा.*] पंत प्रधान स्वामी समागमें जाऊन तिकडील मनसबा उतम रीतीने सिध्धीस नेला चालीस पंचेतालीस लक्ष रुपये मेलविले बदोबस्त उतम केला हे येश मोठे त्यांचे पदरी पडले कनिष्ट श्रीम...लगामी बहूत आहेत त्यास उभैथा श्रीमत...येकत्र जालियावर त्यांचे मानस की सकारपूर्वकास...मानस जेष्ट स्वामीचे व मकारपूर्वकाचें परंतु सि[ध्धीस जाता] दिसत नाही कनिष्टाचा व सर्वांचा आग्रह आहे...स जाणार नाही जेष्ट स्वामी या गोष्टीस्तव बहूत दिक व श्रानसंध्या करितात सकारपूर्वकावर ममता बहूत परंतु सिध्धीस जाता दिसत नाही याप्रकारचे वर्तमान आहे प्रस्तुत राजश्री नारो शंकर मालेगाव येथून तीस बतीस कोस खांदेशप्रांती आहे तेथे आहेत राजश्री माहादजी सिंदे यानी समागमे न्यावयास बहूत मिनत केली पायादेखील पडले परंतु हे न गेले इकडे राहिले हे वर्तमान श्रीमंत स्वामीस कलले व माहादजी सिंदे यानीही कितेक नारो शंकराविषई विषमभाव लिहिला त्यांजवरून श्रीमताची इतराजी आहे राजश्री नारोपंत नानानी राजश्री आच्युतराव गणेश याजला पुणियास रवाना केले आहे ते श्रीमंताची भेट घेऊन

तेथील आर्थ मनास आणून नानास लिहितील मग पुणियास नारोपंत नाना जातील परतु घरी बसल्याने श्रीमंताची इतराजी बहूत जाली व स्वरूपास आंतर पडले च्यार रुपये सरदारीस खर्च जाला तेही येणे कठीण प्रसंग विलक्षणसा दिसतो आमचे वर्तमान तर राजश्री नारो शकर घरी बसले माहादजी सिंद्याचा आमचा परिच्यये नाही नारोपंताचा माहादजी सिंद्याचा पेच आपण उठून माहादजी सिंद्यासमागमे जावें तर नारोपंत नानाचे चितात विषमभाव येईल च्यार सा महिने नारोपंतासमागमे राहिलो व त्याने ममता केली व तुरुत ते घरी बसले आपण उठू[न*] गेले तर मतलबीपण दिसते यास्तव घरी बसलो माहादजीबावासमागमे जावे तर तेथेही चव नाही फौज उपासी मरत होती व त्यांचेही सरदारीचे पुर्ते शास्वत नव्हते यास्तव दोन तीन महिने घरी बसलो प्रस्तूत रोजमराही...खर्चाची वगैरे मोठी आबाल तो आर्थ पत्री लिहिता पु[रवत नाही]...स जेष्ट मासी श्रीमंत राजश्री पंतप्रधान व [त्रिंबक]राव मामा पुणियास येणार त्यास ते तेथे आलियावर...ऊन पुणियास जाऊं तेथे गेलियावर जे वर्तमान होईल ते सो (ले) लिहून पाठऊं वडिलांची पत्रे आबदालीकडील सलुखाचा आर्थ कितेक लिहिला त्यास राजश्री त्रिंबकराव मामाचे कनिष्ट बंधू राजश्री माधवराव मामा येथे आहेत त्याजला हे पत्रे दाखऊन याचा आर्थ कितेक राजश्री माधवराव मामा यानी त्रिंबकराव मामास लिहिला आहे व माणूस तिकडे पाठविले आहे माधवरायांस बहूत ममतेत घेतलें आहे व त्यानीही कितेक प्रकारें वच्यन दिधले आहे प्रस्तूत येख्तियारही सर्व त्यांचाच आहे मनसबा येखादा उभा करतील माधवराव मामाही आठा दाहा रोजा पुणियास जाणार त्रिंबकराव व हे येकत्र जालियावर आम्हांस बोलाऊन पुढे हस्ती वस्त्रे श्रेहाची पत्रे आबदालीस लिहून रवाना करावें असा मजकूर केला आहे बहूत ममता करितात व तीर्थ स्वरूप कैलासवासी रामचद्रबाबाप्रमाणे यांचाही प्रकार आहंकारी व येकवचनी आहे ज्या...अपले म्हणले त्याजसाठी सर्व-प्रकारे साहित्य करून त्याचे उर्जीत करावे येसा यांचा प्रकार यास्तव यांस ममतेत घेतले आहे भोज्यनास बोलाऊन वस्त्रे वगैरे दिधले बहूत ममतेत घेतले आहे बोलल्या गोष्टी सिध्धीस जातील तेव्हा सर्व खरे राजश्री महिपतराव चिटणीस आपल्या पुत्राचे वृतबंधानिमित्य येथे आले आहेत त्याजलाही घरी आणून मेजमानी वस्त्रे वगैरे देऊ[न*] मार्गस्त केले तेही बहूत ममता करितात आम्ही जेष्ट मासी पुणियास जाऊन श्रीकृपेने सत्वरच चरणदरशनास येतो यानंतर राजश्री माहादजी सिंदे त्या प्राती गेले त्यास निंबाबाई सखूबाई जनकोजी-बावाची मातुश्री त्यांचे...माहादजी सिंदे सरदार न करावे परंतु श्रीमंतानी केले खा......ये नाही यास्तव काही न चालले प्रस्तूत राजश्री......यांचे मानस माहादजी सिंदे स्वतंत्र सरदार...

---

ले. ५० } श्रीवरद } श. १६८४ चैत्र वद्य ११
रमजान २४ } } इ. १७६२ एप्रिल २०

श्रियासह चिरजीव राजश्री तात्यासाहेब यांसि प्रती बापूजी माहादेव व पुरुषोत्तम माहादेव कृतानेक असीर्वाद उपरी येथील कुशल ता छ २४ माहे रमजान मुकाम लाहोर जाणौन स्वकुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष तुम्ही छ [मो. जा.*] माहे रजबचे पत्र श्रीमंताचे पत्रासमागमे पाठविले ती छ ८ रमजानी मुकाम मजकुरी पाऊन परमहर्ष जाहाला तो श्री जाणे कितीक विस्तारे मजकूर लिहिला तो कळला येच रीतीनें सदैव कुशलार्थ लिहून भेटीतुल्य संतोषवीत जावे इकडील वृत तरी पूर्वी छ १ मजकुरी विस्तारे लेहून पाठविले आहे त्याजवरून कळेल हाली वर्तमान तरी शाहानशाहा अश्रफुल-उजरा शाहावलीखा अद्यापी येथच आहे रमजानचा महिना जालियानंतर कूच होईल दुसरे श्रीमंताचा प्रताप जाहाला याची खुसी याजला अत्यंत होऊन उभयेता श्रीमंत येजमानास टिका देऊन आम्हास देशास रवाना करणार आम्हीही टिका वगैरा सरजाम घेऊन अविलंबे येतो काही चिंता न करणे श्रीकृपेने मातुश्रीसाहेबाचें व तुमचे दर्शण थोडाकियाच दिवसा लाभ होईल श्रीमंत येजमानाचे दर्शण होऊन मनोरथ सिधीसी श्री नेवील तो सुदीन तुम्ही लिहिले की कुटंबाची स्वस्तता व मातुश्रीचे चरणदर्शण घ्यावयास आठा चौव रोजा नाशकास जाऊ म्हणौन लिहिले त्यास गेलात किंवा नाही हे लिहावे आणि आमचे तरफेने मातुश्रीचेही समाधान करावे की बालकेही सत्वरच यतेत इतके दिवस येतो येतो म्हणौन लिहितो येसा अर्थ श्री करणार नाही जे दिवसी येथून कूच करू देशास ते दिवसी सविस्तर निश्चयाचे वृत लिहून पाठऊ त्याजवरून केळेल तुम्ही आपले व मातुश्रीचे वृत वरचेवर लिहीत असणे श्री कृपा करो भेट होये तो सुदीनं सदैव कुशल वृत लिहीत, असणे रा नारोपत नानास पत्रे पूर्वी पाठविली त्याचे येकही उतर न अले याचे कारण काये ते लिहिणे अतां सर्व ग्रहदशा उतमच अली अहे श्रीकृपेने उतमच होईल चिंता न करणे हे अनेक असीर्वाद

श्रीमत स्वामीसमीप असाल तर सविस्तर विनती लिहिली अहे त्यावरून कळेल नाहीतर भेटीनंतर सांगू श्रीकृपा करो भेट होये तो सुदीन हे अनेक असीर्वाद समस्त मंडलीस सा नमस्कार अनुक्रमे असीर्वाद......सलाम

अज्ञाधारक केशो सुंदर कृतानेक सां नमस्कार विज्ञाप्ति ऐसी जे सदैव पत्री सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत कृपा कीजे हे विज्ञाप्ती

तीर्थरूप मातुश्री आमासाहेब वडिलांचे सो कृतानेक सां नमस्कार विनती की चिरंजीवास लिहिले अहे त्यावरून श्रुत होईल अतःपर श्रीकृपेने सत्वरच दर्शणलाभास येतो दर्शनलाभ होये तो सुदीन श्रीकृपा करो शरीरास

अरोग्य राखणे उपोषणे न करावी येबदी बालकावर कृपा केली पो दे विनंती चिरंजीव मन्याबाईस अनेक असीर्वाद लिा परिसोन सदैव कुशल वृत लिो अनेक असीर्वाद सौ अनदीवहिनी व लक्ष्मीवहिनीस व तथा रेणुका वहिनीस तुळषा वहिनीस सां नमस्कार चिरंजीव सौ अनेक असीर्वाद सदैव......

---

ले. ५१ } श्री { श. १६८४ आश्विन शुद्ध ६
सु. ११६३ रवल ४ } { इ. १७६२ सप्टेंबर २३

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री बालाजी गोविंद गोसावी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा सलास सितेन मया व आलफ तुम्ही विनंतीपत्र सोलावे सफरचे पाठविले ते चवथे सौवली पावले आबदालीकडून वकील जैनगरास आले राजे माधोसिग यानीही वकील हुजूर पाठवावयास तयार केले सो फेली याप्रो वर्तमान असे व कोटेकराचे निष्टेचा प्रकार लिहिला तो सविस्तर विदीत जाला या उपरीही राजे माधोसिंग यांजकडील वर्तमान वगैरे ते प्रांतीचे अधिकोतर अदललियास लेहून पाठवणे जाणिजे छ ४ सौवल [नि*] आज्ञा प्रमाण

---

ले. ५२ } श्री { श. १६८५ श्रावण शुद्ध २
सु. ११६२ (४) सफर १ } { इ. १७६३ आगस्ट ११

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य रा केशो गोविंद गोसावी यासी

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा इसने सितेन मया व अलफ निजाम आलीखान राक्षेसभुवनावर गंगा उतरावयासी गेले खासा उतरून पलीकडे गेले बाहीर बुनगे काही फौज काही पलीकडे उतरली आलीकडे विठलदास वगैर नावजनाम सरदार राहिले त्यास जाऊन गांठले ते तयार होऊन उभे राहिले छ २९ मोहरमी लढाई जाली च्यार सा घटिका लडाई निकटीची जाहली विठलदास व गोपाळसिंग राजे खदारकर व विनायेकदास वगैर ठार जाले पांच सा हजार माणूस पडले बाबूराव जंगी व रघुनाथराव पिंगले व मुरादखान व बालोजी घोरपडे पाडाऊ आले तोफा सा सापडल्या निजामआली...कडे होते रात्री कूच करून...प...तो...डेरे टाकून गेले श्री...करून फते जाली माहादजी... बाळकर व खलोजीराऊ पाटणकर व चिंतो कृष्ण चिमणगावकर व मानसिंग रजपूत व देवाजी नारायेण सुभेदार जुनरकर ठार जाले यासिवाये आणखी पडले जखमी जाहले तुम्हास कळावे...जाणिजे छ १ सफर

| मोगलाकडील | श्रीमंताकडील |
|---|---|
| १ विनायकदास | १ माहादजी निंबालकर |
| १ विठलदास | १ चिंतो कृष्ण चिमणगांवकर |
| १ गोपालसिंग ख्दारकर | १ देवाजी नारायण सुबे जुनर |
| १ सदासीव रामचंद्र | १ पागा मानसिंग |
| २ दस्तेखान आा अलजपूर | |
| १ उदाजी पवार | जखमी |
| १० गोविंदराव पिंगळे वगैर आा | १ हरिपंत |
| | १ बाजीपंत |
| पाडाऊ | |
| १ मुरादखान | २ |
| २ चांदखानभाऊ | |
| १ शाहजी सुपेकर | |
| ४ | |

---

ले. ५३ श्री { श. १६८५ मार्गशीर्ष शुद्ध ८ सुमा
इ. १७६३ डिसेंबर १२ सुमार }

पुा श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान स्वामीचे सेवेसी
विज्ञापी ऐसी जे

[ डावें कोष्टक* ] जाट सुरजमल याणी फरकनगर घेरून लडाईचा उदेग धरला आहे याचे कारण इतकेच की जाट मजकुराचे मानस की बाहदरखा बलोच याचे गढ व फरकनगर येथे आमल आपला करून बलोचास परागंदा लावावे याची कुमकीचा अत्यग्रह नजीबखान करील तरी त्यासीही लढाई करावी नजीबखानाचा मनोदये की बलोचास त्याचे स्थळीं पूर्ववतप्रमाणे कायेम राखावे हा अभिमान धरून त्याचे लोक जमा करून लढाई होणार साप्रत्य करवली होत असती आणि खान मजकुराचा चाकर दलेलसिंग उभयेताचे सलूखाचे बाबसालात आहेत अद्यापि जुंज अथवा सख्य जाले नाही मागाहून होईल तैसे विनंती लिहू

[ उजवें कोष्टक* ] जंबूचा राजा रंजीतदेव लाहोरास आले सवा लाख रुपयाचा चबुत्रा करून पातशाहास बसविले घोडे जवाहीर वस्त्रे नजर केली वजिरास पन्नास हजार रुये नजर करून घोडे जवाहीर वस्त्रे दिधली पातशाहानी कृपा करून खिलताची परवानगी दिवली अद्यापि लोहोरीच आहेत आपले राज्यात गेले नाहीत मागाहून वृत आलिया विनंती लिहू १ कलम

सिरोंजेहून गुलराब येलची दिा शाहावलीखा श्रीमंत कैलासवासी साहेचापासी तीा रा बापूजी माहादेव याने...जाऊन येक ‹ व ›वचनप्रो शाहावलीखानास त्याचा विस्तार ते निवेदन करून सेवकासही सांगितलें व याजहून विशेषात्कारे स्नेह करून यानीही वचनप्रमाण केलें जाबसाल जाला माहीतगार आहे म्हणोन मशारनिलेसच समागमे आणिले याकूबआलीखानास आणावे तर याचा खर्च फारी यास्तव याचा आणावयाचा मनसबा न केला पूर्वी शाहावलीखानानी खान मजकुरासमागमे स्वामीस घोडे पाठविले मार्गामुळें सेवेसी येऊन सकले हाली दिलीस येऊन पोहचलो घोडे व याकूब आलीखानाचा ग्रहस्त समागमे घेऊन सेवेसी येऊन• पोहचतो १ कलम

सो याचा विस्तार....करू शृत होये

सदरहू कलमे तीन याजवरून शृत होईल इद्रप्रस्थी पोहचून कामकाज करून कूच करितो मार्गात सुरक्षीत श्रीकृपेने स्वामीचे प्रतापे सेवेसी पोहचून दर्शणलाभ होये तो सुदीन वरकड वृत मागाहून तपसिले विनती लिहू सदैव कृपाळू होऊन साभाळ करणार स्वामी समर्थ आहेत

---

| | | |
|---|---|---|
| ले. ५४<br>शाबान १७ | श्री | श. १६८५ माघ वद्य ३<br>इ. १७६४ फेब्रुवारी २० |

श्रियासह चिरंजीव राजश्री तात्यासाहेब यासी प्रती बापूजी माहादेव व पुरुषोत्तम माहादेव कृतानेक असीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ १७ माहे शाबान मुकाम पायेल नजीक सिरहंद जाणौन स्वकीये कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष तुम्ही राजश्री नाना फडनीस यांचे पत्रासमागमे विस्तारे पत्रे पाठविली ते छ १४ माहे मजकुरी सिरहंदेहून लाहोरचे वाटेवर पाचा कोसावर तिळशर्करा पाठविले ते घेऊन खज्याचे सराइतमधे पाऊन समाधान जाले ताम्राचे लडाईचे व सलुखाचे व श्रीमताचे....लिहिले येकून परम....ला तो पत्री कोठवर स्याहावा मोगला....कस्त जाली म्हणून श्रीमंत स्वामीसी सलूख केला आणि जागीर देऊन जीव वाचविला श्रीकृपेकरून श्रीमंताचा प्रताप राहिला आणि दक्षणचे मोगलाचे मुख शाम जाले व श्रीइछेकरून व श्रीमंताचे प्रतापेकरून शत्रूचेही मुख शाम होईल दुसरे राजश्री गोविंदराव पुरुषोत्तम याणी आमचे खर्चाची आबाळ आहे म्हणौन सागितले यास्तव तुम्हास चिंता लागली तरी दिवस येकसे राहत नाहीत दोन दिवस सुखाचे व दोन दिवस दुखाचे जातील आणि सर्व सु....होऊन श्रीकृपेकरून तुमचा प्रताप होईल काही तिळतुल्य चिंता न करावी तुम्ही लिहिले की राजश्री नारो शंकर याची रवानगी श्रीमंत हिदुस्थान प्रती करणार याजसमागमे आम्ही येऊ याचे मानस नाशकास

जावयाचे आहे म्हणौन लिहिले त्यास तुम्ही याजसमागमे जाऊन तीा मातुश्री आमासाहेबाचे चरणदर्शणाचा लोभ घेऊन याजबरोबर लवकर येऊन आम्हास भेटीचा लोभ द्याल तो सुदीन राजश्री पंत मजकुरास वरचेवर पत्रे पाठवितो परंतु प्रत्योतर येकही न आले तस्मात दिसून आले जे थोरली सरदारी प्राप्त जा.... स्तव....त्याहावयास अवका....से व दुसरे तुम्ही लिहिले की राजश्री { किंवा पत्रे तुम्ही न पाविली किंवा पत्रेच न पावली हे न कले } [मल्हा]रजी होलकर सुभेदार याजपासी जाऊन याला मायेत घेणे त्यास पूर्वी आबदालीकडील भला मानूस समागमे घेऊन दिलीहून कूच केले इत्क्यात वर्तमान येकिले की सुभेदारास जखम लागली म्हणौन माघारा देशास गेले वाटेत माधोसिंगाने धूम फार केली दक्षणी माणसास जीवे मारितो बालाजी गोविंद वकील याचे वर्तमान बहूत दिवस जाले येकतो की कैद केले न कले मारले व न कले कैद केले यास्तव माघारा दिलीसच आलो इत्कियात शाहा आबदालीकडील बोलाऊ आले यास्तव इकडे....रून शाहादऱ्यांस आलो मागून....

२

साहेब आले उभयेथानी बरोबर न जावे यास्तव आम्ही गहात होतो परंतु तीर्थस्वरूपानी चालावयासाठी अग्रह बहूत केला यास्तव इकडे स्वार जालो तो मुकाम मजकुरी लक्ष्मी नारायेण व जेनखान सिरहंदकर याचे लस्करात आज-पावेतो श्रीकृपेकरून सुखरूप पावलो आसो याचा खजिना शाहापासी जाणार आणि शाहा बमे फौज लाहोरात दाखल जाला येथून लाहोर साहा सात दिवसाचा मार्ग आहे लवकरच पोहचू श्रीकृपेकरून मनोदयानरूप कार्यभाग करून देशासच येतो तुम्हीही येऊन सर्व वृत रा सुभेदारास निवेदन करून मायेत घ्यावे व सर्वत्र मंडली दोहीं दरबारची याजलाही श्नेहात ठेवावे आमचे येथून येका दो दिवसा कूच होईल चिरंजीव गणोबा आवघे मिलोन इकडे न जावे यास्तव दिलीत त्याज-लाच ठेविले आहे दुसरे तुम्ही लिहिले की राजश्री जनकोजीबावाचे वर्तमान त्याहावे तरी आमचे या देशात राहावयाचे कारण हेच की रा गोविंदराव पवार मातबर याच्या जबानी वर्तमान सागितल्यावरून आम्ही सकूबाईस व रा चितो-बास व श्री....स पत्रे लिहिली आता कलोन आले जे ते राम....ने जाले आद्यापी येत नाही आणि दस्तायैवजासाठी आम्ही बहूत उद्योग केला परंतु दस्तायैवज न आला रा जनकोजीबावाचे नावे करून रघूजी घायबर आला आहे म्हणौन लटके वाटते परंतु रा गोविंदराव पवार याणी जमीदारास आम्हाजवल बोलाविले होते याचे जबानी वर्तमान येकिले की तुमच्या फौजा हिंदुस्थानात आल्या म्हणजे दस्तायैवजही आणून देऊ आणि मुख्यासही आणून फौजेत पोहचाऊ येसे वर्त-मान सांगतात आद्यापी काही ठीक नाही...

ले. ५५ } श्री { श. १६८६ आश्विन शुद्ध १४
सु ११६५ रखर १२ } { इ. १७६४ आक्टोबर ८

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री पुरुषोत्तम माहादेव गो यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें लिहिणे विशेष तुम्हीं पत्र छ ३ रबिलौवलचे पाठविलें ते पावले......जवाहिरमल जाट याचा व न [ वलसिंग जाट ] याचा हर्षामर्ष लागला आहे तो तोडायाचा मनसबा राजश्री मल्हारजी होलकर याचा आहे म्हणून व सुजाअतदौले व पातशाहाकडील वगैरे वर्तमान विस्तारे लिहिलें ते कळो आलें ऐसियास या उपरीही तिकडील बारीक मोठें वर्तमान वरचेवर लेहून पाठवीत जाणे जाणिजे छ १२ राखर सुा खमस सितैन मया व अलफ बहूत काये लिहिणे [ वा.* ] लेखना । वधिः

---

ले. ५६ } श्री { श. १६८६ माघ शुद्ध २
सु. ११६५ शाबान १ } { इ. १७६५ जानेवारी २३

राजश्री पुरुषोतम माहादेव गोसावी यासि

ई अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. बा.* ] स्नो मलारजी होलकर दंडवत विनंती उपरी तुम्ही पत्र पाा ते पावोन लेखनार्थ अवगत जाला रोहिल्याकडील बातमी लिहिली त्यास येथून मकाजी गिते व बीरभान हजारी वगैरे फौज तुम्हाकडे पाठविली आहे त्यास तुम्ही पलीकडील बातमी रात्रदिवस राखून घावडाव पाहून फौज पाठऊन जे रोहिल्याकडील लोक येतील त्याचे पारपत्य करवणे गुजराकडील व गैर मुळूक आहे तेथील कहीकावाड करून गांव मारून ताराज करणे साराश बातमीची गाफली नसावी [नि *] सुहूर सन खमस सितैन मया व आलफ जाणिजे छ १ साबान बहूत काये लिहिणे हे विनवी [ हिंद १।३१ प्रो शिमो* ] पौ छ २ साबान

---

ले. ५७ } श्री { श. १६८७ माघ वद्य ७
शाबान २१ } { इ. १७६६ फेब्रुवारी २

पुा राजश्री पुरुषोतम माहादेव गो

उपरी खासा स्वारी आनदवलीहून निघाली दरकूच हिंदुस्थान प्रांते येत असतां राजश्री जानोजी भासले याणी बदराहा वर्तणूक केली त्यास जरब पोहो-चावणें जरूर सबब वराड प्रांते आलो तो त्यांनी फौज तोफखाना भारी पाहून शरण आलें येऊन भेटलें तेव्हा त्याजपासून जागीर काही घेतली बाो चाकरीस

येतात याउपरी दरमजल ते प्राते स्वारी येत असे जाणिजे छ २१ शाबान बहूत काये लिहिणे [वा.*] लेखना। वधिः

---

ले. ५८ } श्री { श. १६८८ वैशाख शुद्ध १
जिल्काद २९ } { इ. १७६६ मे ९

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री पुरुषोतम माहादेव गोसावी यासि

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणे विशेष तुम्हीं विनती पत्र छ २१ सवालचे पाठविले तें छ २३ जिलकादी प्रविष्ट जाहालें जवाहिरमल जाट तीस पसतीस हजार ढवलपुरा-नजीक आला राजश्री मल्हारजी होलकर याचे फौजेस सिकस्त दिल्हीं यांची उमेद फार व सर्वही जाटास सिलाले म्हणोन विस्तारे लिहिले ते कलले याउपरीहीं तिकडील वर्तमान पातशाहा व फिरंगी व रोहिले व नजीबखान व सुज्याअतदौला व माधोसिंग व गैर याचे वरचेवरी लिहीत जाणे सरदार कोणे जागा व तीर्थरूप कोठपर्यंत गेले सरदाराची व तीर्थरूपाची भेटी जालीच असेल तरी कर्तव्य मनसुबा वरचेवरी लिहीत जाणे तुमच्या पत्राची उतरे वरचेवरी रवाना होत असता पावत नाही म्हणौन लिहिले अपूर्व असे येथे उतर राहात नाहीं अबदाली व सिखाचेही वर्तमान लिहिणे जाणिजे छ २९ जिल्काद [नि.*] बहूत काये लिहिणे [वा.*] लेखन। सिमा

पौ छ ७ सफर सध्याकाल

---

ले. ५९ } श्री { श. १६८८ ज्येष्ठ वद्य ६
मोहरम २० } { इ. १७६६ जून २८

राजश्री पुरुषोतम माहादेव गोसि

उपरी तुम्ही विनंतीपत्र छ ८ मोहरमचे पाठविले ते पावले हफिजाने आपली फौज तोफखाना श्रीगंगापार पाठविला खासा फरुकाबादेस संनिध्ध आहे त्याचे बोलण्यांत ताळ नाही फिरग्यांसी व जाटाची साक्ष केली कार्तिकमासी गुंज बाधोन दक्षणियासी जुनणार त्यास सरकारची फौज दोनतीन घाटानी इकडे उतरू लागल्यास ह्या समयांत मर्जीनरूप वर्तणूक करितील हे सला वजिराची आहे फौज इकडे नच येई तर यांसी दारमदार राखली नाहीतर जबरदस्त भाषणे करीत आहों त्यापेक्षा अधिकोतर करूं मर्जी असेल तशी आज्ञा व्हावी अहमदखानाने आम्हांस वजिराचेथे बोलाऊन नेले हफीज व आम्ही येकत्र होऊन ज्या गोष्टीने श्रीमंताची मर्जी व वजिराची राजी राहे तेच करू म्हणोन बोलोन वजिराचेही समाधान केले उदैक हफीज येथे न आला तरी बगस तेथे

उदैकच जाणार इत्यर्थ ठरेल तो सेवेसी लेहू म्हणौन लिा ते कळले. अैशास येकल्या हफिजाने मगरूरी केली तर त्याचा मजकूर काय आहे त्याणे अेह करून कृपा संपादून घ्यावी यांतच उतम आहे नाहीतर जादबरसात पारपत्यच करूं गाजुदीखानासही सांगणे तुम्ही सख्त जाबसाल न करणे सख्त जाबसालाने कार्ये होणे व फार नरमही न करणे अेह मात्र तोडू नये पुढे जसा ते रक्षितील तैसा इकडूनही होईल छ २० मोहरम [वा.*] लेखना। वधि:

---

ले. ६० }
सु॰ ११६७ रखर ९ }
श्री
{ श. १६८८ भाद्रपद शुद्ध १०
{ इ. १७६६ सप्टेंबर १४

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री राजाराम गोविंद गोसिं

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा सबा सितैन मया व अलफ तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें ते पावले कितेक मजकूर विस्तारपूर्वक लिहिले ते निवेदन जाहाले याविसीची आज्ञा राजश्री पुरुषोतम माहादेव याचे पत्री लिहिली आहे त्यावरून कळेल ते पत्र तुम्ही पाहून त्याप्रो वर्तणूक करणें जाणिजे छ ९ राखर दोन लक्ष रुपये अहमदखानाकडून [खर्चा]प आणविले आहेत [ते] रुपये पाठविले तरी त्या[चे] बोलणे प्रमाण अेह खरा अैसे वाटेल काबूचा प्रकार दिसणार नाही हाफीज वगैर सरकारचे मर्जीप्रो न चालल्यास फळ पावतील त्याचा मजकूर किती आहे यमुना उतरल्यावरी पाहून घेऊ तुम्ही गरम व नरम राहात जाणे जो अेह करील त्यासी अेहाच्याच गोष्टी वाढवाव्या व जो मगरूरी करील त्यासी मगरूरीच्याच गोष्टी सागाव्या होलकर व भोसले व गाइकवाड वगैर तमाम फौजा बलाविल्या आहेत लौकरच येतील व याचे पारपत्य करणे अगाध नाही तुम्ही वजिराचे विचारे बोलत जाणे जाणिजे छ ९ राखर [वा *] लेखना। वधि:

---

ले. ६१ }
रखर २८ }
श्री
{ श. १६८८ भाद्रपद वद्य ३०
{ इ. १७६६ आक्टोबर ३

अियासह चिरंजीव राजश्री नानासाहेब यांसि प्रति बापूजी माहादेव कृतानेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता छ २८ रोखर मुा इंद्रप्रस्त जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुमचे पत्र छ १९ रोखरचे आले ते पावले बहूत समाधान जाले येसेच सदैव पत्री संतोशवीत जावें यानंतर तुम्ही लिहिले कीं येथे आद्यापवर प्रथम दिवस आहे त्यास आम्ही येथे येकिले आहे की...जर हिंमतखा यानी अहमदखानापासी कु[रा]ण पाा आहे कीं जे अहमदखा करतील ते आम्हास प्रमाण येसे येकिले त्यास तुम्ही हे कांहीच लिहिले नाहीं

दुसरें नवाब निजीबदौले नजीबाबादेस गेले आहेत तेथे मातंम्रोसीसाठी दुंदेखां वगैर येणार तेथे आवघे येकवट होऊन जो जाबसाल ठैरलियावर मग जे करणे ते करतील दुसरें लिहिले की श्रीमंत स्वामी खंडणीचा पैकाही घेतील आणि फौजेसमेत बराबरही राहातील कलले पा। यानंतर श्रीमंताची पत्रे छ ६ राखरची बहूत कृपेची आली नवाबासही पत्रें आलीं तें नवाबाकडे रो केली जाब आले म्हणजे आम्ही विजयादशमीचे मोहर्तेकरूण श्रीमंताकडे स्वार होऊ श्रीमंता-पासी गेलियावर श्रीकृपा करतील सर्व उतम होऊन येईल दुसरें नासिकचे वर्तमाण लिहिले की तीर्थरूप मातुश्री आमासाहेब सुखरूप आहेत चिरंजीव रो तात्यासाहेब व चिरंजीव गणपतराऊ नाशकांतच आहेत हिंदुस्तानास येणार म्हणून लिहिले ते कललें दुसरे लिा कीं नाशकाकडील वर्तमाण बहूत दिवस जाले आले नव्हते याकरिता...जोडी रो केली आहे तेथून पत्रे आलियावर वडिलापासी पाठऊ म्हणून लिा त्यास बहूत दिवस जाले आम्हाकडेही नाशका-कडील वर्तमाण आले नाही तुम्ही कासीदजोडी पा। उतम केले दुसरें श्रीमंती लिा होते की दक्षणेहून फौज मातबर रो जानोजी भोंसले व दमाजी गायकवाड व रो मालजीराऊ होलकर वगैरे तोफखानियांसुधा बोलाविले आहेत यांजबराबर चिरंजीव तात्याही येतील [नि.*] बहूत काय लिा लोभ असों दीजे हे आसीर्वाद

---

| | | |
|---|---|---|
| ले.६२ आश्विन शुद्ध २<br>रखर ३० | श्रीशंकर<br>श्रीवरद श्रीवरद मूर्तीप्रसन | श. १६८८ आश्विन शुद्ध २<br>इ. १७६६ आक्टोबर ५ |

तीर्थस्वरूप राजश्री [मो. जा.*] नानासाहेब वडिलांचे सेवेसी

अपत्यें विनंती सेवक खंडो त्र्यंबक कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशळ ता। आस्वीन शुध्ध २ मु॥ लश्कर नजीक गोहद येथास्थीत आसे विशेष आम्ही लश्करास आलियावर रो जिवाजीपंत सेवेसी रवाना जाले त्याज-समागमे विनंतीपत्र सेवसी पाठविलें होते पाऊन सविस्तर विदीत जाले आसेल सांप्रत इकडील वर्तमान तर गोहदचा प्रकार प्रथम दिवस आहे मोरचे श्रीमंताचे व सिंद्याचे व नारो शंकराचे जवळ जाऊन पोहचले आहेत गढीस नदीचा परीघ राउताचे व पायेचे मनुशाचा येत्न चालत नाही तोफबंदुखेची लढाई आष्टोप्रहर लागली आहे दिवसातून येखादी वेळेस गाऊकरीही मोरच्याबाहेर निघून दस्त-बोसी करून जातात दाहापाच माणसे इकडली तिकडली नित्यानी हरिस्मरण करित्यांत गढीत गिर्दपेशचे गावाचे लोक बहूत रईरेथ भरले आहेत कोठवर दम धरतील श्रीसतेने श्रीमंत येशश्री व प्रतापवान आहेत कांहीक दिवसात स्थळ हस्तगत होईल व शत्रूची मुखें शाम होतील दुसरे रो बाबूभट मटकर भेटले होते त्यानी वर्तमान सांगितले की येक दोन वेळा श्रीमंतान स्वमुखें राज्याजीची तारीफ बहूत केली आसमंतात जे मुसाहेब होते त्यानीही तारीफ

केली इत्यर्थ ठरला कीं त्यांजला एजूर बोलाऊन त्याचे विद्येमाने कितीक कामे काजे घ्यावी म्हणजे बहूत द्रव्य मिळेल त्याजवरून श्रीमंताची आ कारण पत्रें राज्याजीष गेली आहेत श्रीकृपेने निदर्शनास येईल ते खरे आमचे वर्तमान तर पूर्वी विनंती केलीच आहे उंट व घोडी माणसाची मार्गप्रतीक्षा आहे विठलपंत बक्षी व सिवराम नाईक वगैरे दाहा पांच असस्तास नारो शंकरानी प्रयास जावयाची आज्ञा दिघली विजयादशमीचे मोहर्ते स्वार होऊन जाणार घरपावेतो सोहबत मायेची आहें कोणे गोष्टीचा गुंता नाही वडिलीं कृपा करून दसरियापावतो जे रीतीने कळेल ते रीतीने उंट व दोन्ही घोड्या व तट्टू व जे वस्तभाव तेथे आहे ते बमोजीब यादास्त राजेश्री बजोपंताकडून पडताळून खासीष सुरक्षीत पाविली (पाविली) पाहिजे दिवसगत लागलिया सोहबत जाईल व मीं तोहमसी पडेन मागून माझे पाहचने होणार नाही मजबार [अपूर्ण*]

---

ले. ६३ } श्री { श. १६८८ कार्तिक शुद्ध १२
सु. ११६७ जखर १० } { इ. १७६६ नोव्हेंबर १३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी माहादेव स्वामी गोसावी यांसि

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्हीं विनतीपत्र पाठविले ते प्रविष्ट जाहालें हिंदोस्तानच्या उमरावाचे व अबदालीचे व पातशाहा व फिरंगी याजकडील वर्तमान व जाटाकडील वर्तमान लिहिले ते कललें या उपरीही तिकडील वर्तमान उमदे अमीरान व जमीदाराचे व जाटाकडील लिहीत जाणे अबदाली कोठें आला तेही लिहिणे व फिरंगी पातशाहापासून जावयाचे कारण काये ते लिहून पाठवणे तीर्थरूप राजश्री दादासाहेब गोहदेस माहासरा देऊन आहेत बहुधा गोहद हस्तगत करून पुढे कोणीकडे स्वारी गेली ते लिहिणें जाणिजे खासा स्वारी पुण्याहून निघाली भीमाकृष्णातीरानी जात असों पुढे होईल विचार तो लिहिला जाईल जाणिजे छ १० जमादिलाखर सुा सबा सितैन मया अलफ [नि.*] बहूत काये लिहिणें [नि.*] हे विनती

---

ले. ६४ } श्री { श. १६८८ कार्तिक शुद्ध १४
सु. ११६७ जखर १२ } { इ. १७६६ नोव्हेंबर १५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री पुरुषोतम माहादेव गो यांसि

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष तुम्ही छ ९ जाखरचे विनंतीपत्र पाठविलें ते पावलें स्वामीनी करारनामा पाठविला तो अहमदखान याचे चितास न अला यानकरितां

अम्ही आपले नावचा देऊन हफीज रहिमत याची फौज आणावयास पाठविले हुजूरचा करारनामा मसुदा पाठविला आहे त्याप्रो पाठवावा म्हणून व दिलीकडील राजकारणाचा प्रकार लिहिला तो विदीत जाला अैसियास तुम्ही मसुदा पाठविला त्याप्रो सरकारचे करारनामे पाठविले असेत त्यांस देऊन उभयेता आपले पुत्राव्रो दाहा हजार फौज व प्यादे पाठवीत आहेत ती जलदीनें गोहदचे मुकामास घेऊन येणें दिलीकडील राजकारणाचा मजकूर तरी तुम्हासीं जे बोलतात त्याजला व्रो हुजूर आणणें येथून फौज पाच हजार त्यासमागमे देऊन पाठविलें जातील नजीबखान याचा सलूखाचा पैगाम आहे सरकारचीं पत्रे त्याकडे गेली आहेत याजकरितां हे राजकारण बहूत गुप्त राखणें कोठे बाहेर न कळें ते करणें वरकड मजकुराचीं उतरें मागाहून पाठविली जातील जाणिजे छ १२-जाखर सुा सबा सितैन मया व अलफ जाजती येक वल मसुद्यात लिहिली आहे ते बाजवीब आहे चाकरीसिवाये सख्य काये कामाचे ते येकनिष्टेने शेवेमध्यें हाजर जाहाल्यास उपद्रव लागणार नाही बहूत काये लिहिणे [बा॥] लेखना । वधिः

---

ले. ६५ } श्री {श. १६८८ कार्तिक वद्य ५
सु. ११६७ जखर १८ } {इ. १७६६ नोव्हेंबर २१

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री राजाराम गोविद गो

रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा सबा सितैन मया व अलफ अहमदखान व हाफीज रहिमतखान याची फौज हुजूर येणार म्हणून तुम्ही लिहिता परंतु अद्यापी येत नाही याजकरितां राजश्री गोविंद रायाजी यांस पाठविलें असे तरी तुम्ही त्यांची फौज सत्वर घेऊन येणे जाणिजे छ १८ जमादिलाखर [नि॥] आज्ञा प्रमाण [बा॥] लेखना । वधिः

---

ले. ६६ } श्री {श. १६८८ कार्तिक
} {इ. १७६६ नोव्हेंबर

विनंती यैसी जे गोहदची मामलत सिंदे नारो शंकराचे विद्येमाने जाली बारा लक्ष मुकरर जाले त्यांतपैकी तीन नगद त्यात येकाचे सानेरुपे व जवाहीर व येक नगद ऐवज व येक गव्या सोडून दिधल्यावर बाकी नवाची काही साले ठैराऊन हाफ्तेबंदी करून द्यावी चौपाचा हजार स्वार प्यायानसीं चाकरीस बोर चालावें त्यांत येक कारकून मात्र येऊन भेटला खासा राणा व मातबर मुतसदी यात कोण्ही हा कालवर येऊन भेटला नाहीं सिंद्याचे मारफांत निशापतीचा डौल पडला आहें सात हाती नेले होते ते परतून दिधलें व येक घोडा नजर पाठविला आज चार पाच रोज जाले की मोरचेही उठून आले आतां सरकारचे मुकरर

मशीराचे जुबानी वर्तमान येकण्यात येते कीं अतरवेदीत उतरून प्र...वर्ती गंगास्नान करावें तेथें भलतें येखादे राजकारण उचलून सिधीस न्यावें सदर्भ तो चोहोकडे आहेतच कूचहीं सत्वरच होणार हे वर्तमान पूर्वी सेवेसी विनती केली आहे आता मागती विनती केली आसे गोविदपंत बाळाजी गोविदाकडे कपठाणापासी सरकारातून रुखसत होऊन कागदापत्रासहीत येणार बलकी सकाळ संध्याकाळी मार्गस्त व्हावें येसे होते परंतु वडिलाचे पुन्येप्रतापे मवकूफ जाले हे वर्तमान पूर्वी लिहिले होते कललेच आसेल हे विज्ञप्ती गोहदचा मजकूर सदरहू नारो शंकराचे विद्यमाने ठैरले आहे परंतु शाश्वत नाही आज पांच रोज रात्रदिवस खिलवत याच गोष्टीचे आसते याजमुलेच आपले जाब्रास दोन रोज आधीक लागले सेवटी गोहदचा काये ढोढो पडतो जे ठैरल ते मागाहून विनंती [लिहिली] जाईल हे विनती

---

ले. ६७ } पुरवणी { श. १६८८ मार्गशीर्ष शुद्ध १
मार्गशीर्ष शु. १ नंतर } { इ. १७६६ डिसेंबर ३

[मार्गशीर्ष] शुध १ स हला केला होता त्यास खंदका‹ प ›पर्यंत गेले होते तेथे जाऊन निशाणे लाविली होती परंतु खंदक खोल होता दोन भाले खोल होता लोकांनी सांगितले की खंदक चार हात खोल आहे म्हणून हाला केला होता परंतु कारेगर न जाला गोहदवाल्याही हला मारून काहडला लोक दोनतीनसे मेले दोन तीनसे जखमी‹ मी › जाले वरकड सरदार कायम राहिले येसे वर्तमान जाले आहे प्रस्तूत गोहदवाल्याची मामलेत चुकली दोन चार लक्ष रुपये देणार अहेत पुढे जाटावर जाणार जाटासीही सला करावा म्हणून जाटाचे वकील आले आहेत घडोन येईल ते खरे रो बापूजी माहादेव यासी श्रीमंत दादाची पत्रे गेली आहेत की भेटीस येणे त्यास ते आद्यापी आले नाहीत रो पुरुषोत[म*] माहादेव फरोकाबादेस गेले आहेत बंगसास घेऊन यावयास त्यास ते फरोकाबादेहून आद्यापी आले नाहीत रो नारो शंकर दरबारास आठा पंधरा दिवसानी जातात विश्वासराव लक्ष्मण यांचा झांसीचा बंदोबस्त जाला नाही या सालची वस्रे जाली आहेत परंतु आद्यापी लस्करांतच आहेत सौ ताई वगैरे लस्करांतच आहे झांसीस जाणार अहेत रो विठल सिवदेव यांचा भेटीस महिना पंधरा दिवसानी जात आसतो कृपा बहूत करितो शुष्क आतिथ्य करितो परंतु लाभ काही होता दिसत नाही आपल्यास देवपूजा करावयासही बोलावीत होता परंतु यांचा सोलवीस वर्ष येक जाले काही लाभ होईल यास्त‹ स्त ›व तिकडे न गेलो तिकडेही काही ताल नाही त्याचा उपाध्या कासीस गेला म्हणून बोलावीत होता त्यास उपाध्याही आला श्रीमंत दादाची कृपा विठल सिवदेवावर बहूत अहे येसे वर्तमान या प्रांतीचे आहे वरकड आमचें वर्तमान तर आबाजीपासी सुखरूप आसो

आम्हाविषई काही चिंता ना करावी विशेष बहूत काय लिा कृपा लोभ कीजे हे विज्ञापी

चिरंजीव जिऊबा व राजाराम व गणोबा यासि आसीर्वाद हरघडी पत्र पाठवीत जाणे हा आसीर्वाद

वरकड सर्व मंडलीस सां नमस्कार सागत जाणे सेवसी केशो ब्राम्हणाचे सां नमस्कार [ बालबोधींत* ] तीर्थरूप मातोश्री वडिलाचे सेवेशी [ मोडींत* ] चिमणाजी सिपी यास आसीर्वद सागत जाणे सौ मैनाबाईस नमस्कार व भवानीस व यमुनास व चेणू व राऊ सर्व मुलास आसीर्वद [ बालबोधींत* ] जनार्दनाचे व कृष्णाचे कृतानेक नमस्कार घरचें पत्र पाठवीत जाणे हरीस खेळू न देणे

---

| | | |
|---|---|---|
| ले. ६८<br>सु. ११६७ रजब ७ | श्री | श. १६८८ मार्गशीर्ष शुद्ध ९<br>इ. १७६६ डिसेंबर १० |

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी गोविद स्वामी गोसांवी यांसि

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष किले विटावा हा किला हाफिजाकडे आहे तो हस्तगत करावयाचे राजकारण राजश्री पुरुषोतम माहादेव याणी मुसा मदद फिरंगी याचे मारफातीने ठीक केले आहे त्यास हाफीज सरकारचे लक्षाने चालत नाही याजकरितां किले मार हस्तग[त*] करावयाविसी मारनिलेस आज्ञा केली आहे ते सरकारचे निशाण वर्ते चढवितील तेव्हा उपरालियास सरकारची फौज आगोदर समीप गेली पाहिजे याजकरितां हे पत्र तुम्हास लिहिले असे तरी पुरुषोतम माहादेव व फिरंगी मजकूर याचे पत्र तुम्हास येताच दीड दोन हजार फौज त्याचे उपरालियाकरितां पाठऊन देणें काम नाजूक आहे बभ्रा होऊ न देणें जाणिजे छ ७ रजेब सुा सबा सितैन मया व अलफ [ नि* ]बहूत काये लिहिणे हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ६९<br>सु. ११६७ रजब १७ | श्री | श. १६८८ मार्गशीर्ष वद्य ४<br>इ. १७६६ डिसेंबर २० |

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री राजाराम गोविद गोसांवी यांसि

रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा सबा सितैन मया व अलफ तुम्ही विनंतिपत्र पाठविले ते पावलें हाफिजाकडील फौज घेऊन मुला मोहसम छ ११ रजेब घेऊन येथे आलें दो चहू रोजी अहमदखान याची व ही फौज मिलोन सेवेसी येतीलसे दिसतें म्हणून लिा ते कळले [अै]शास यामागेच उभयेतांच्या फौजा घेऊन पोहोचा [ व्या ] ते न जालें या उपरी तरी सत्वर येत ते करणें जाटा·

करून महंत रामकिसन व उमरावगीर गोसांवी हुजूर सलुखाकरितां आलें आहे अद्यापी पुर्ता सलुकाचा प्रकार ठरला नाही इतकियात खान मारनिलेच्या फौजा जलदीने येऊन पोहोचलियास त्यासारिखा मनसबा केला जाईल वजिराचे पत्राचे उतर पाठविले असे [ नि.* ] जाणिजे छ १७ रजेब [ नि.* ] आज्ञा प्रमाण [ वा* ] लेखना । वधिः

---

ले. ७० फाल्गुन वद्य १२ नंतर } श्री { श. १६८८ फाल्गुन वद्य १२ नंतर इ. १७६७ मार्च २७ नंतर

पु॥ श्रीमंत राजश्री [मो. जा. *] पंत प्रधान स्वामीचे शेवेसी

विज्ञापना ऐसी जे श्रीमंत स्वामीनी गोहदेचा दारमदार करून जाटासी सख्य न करिता सबलगडास आले करोलीकर राज्यापासून खंडणी घेऊन कूच [ दर कूच ] राजगड पाटण रवीचीवाड्यांत आले [ येकोन येक ग ]ढ्या खाली करून घेतल्या मग खिचीचा रा[ जा ये ]ऊन भेटला खंडणीही थोडी बहूत देऊन हा मरा...जाला कुरवाईभवरासेवाले पठणाही रा। त्रिंबकराव सिवदेव यांचा ब्राह्मण मारिला यास्तव दोन कुचे भारी करून कुरवाईवर येऊन मोर्चे लाविले पंधरा दिवसात तोफखान्याने किला पाहून टाकिला तेव्हां इजतखानाचा पुत्र शरण अला खंडणीही थोडीसी दिल्ही व हाचनगडचा किला खाली करून दिधला सरकारचे ठाणे लाऊन बसले तेथून कूच करून भेलशाचे रोखे सा कोसावर येऊन मुकाम के[ला] [भोपा]लवाले फैजमाखा यानी भेलसे खाली करू[न]...[सर]कारचे ठाणे तेथेही बसले प्रस्तुत कोट्या...साठी या रोखे आलें आहेत दो चौ दिवसात [कोट्या]ची मामलत करून श्रीअवंतिकेस येणार राजश्री मालोजी होलकर यासि देव आज्ञा इंदुरी फाल्गून वद्य द्वादसीस जाली म्हणौन श्रीमंत स्वामीनी राजश्री तुकोजी होळकर व रा। गंगाधर येशवंत यांस हजूर बोलाविले आहे तेही येणार येथे अल्यावर जो विचार होईल तो मागाहून सविस्तर विनंती लिहू कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ती

---

ले. ७१ साबान २४ } श्री { श. १६९० मार्गशीर्ष वद्य ११ इ. १७६९ जानेवारी ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री पुरुषोत्तमपंत नाना स्वामीचे सेवेसी

पो रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत असावे विशेष आपण कृपा करून पत्र पाठविले पावोन सविस्तर अर्थ कलो अला यानंतर आम्ही फौजमुद्धा श्रीमंताचे

लस्करात वराड प्रांती गेलो तुम्ही पत्र पावताच स्वार होऊन श्रीमंताजवळ यावें तेथे आलियावर जसा प्रकार दिसेल त्याप्रो तुम्ही आम्ही मिलोन करावयास येईल तूर्त येथेच येणे आठापंधरा दिवसांत भोसल्याकडीलही फडच्या लौकर होऊन इकडून हिंदुस्तानात जाणे होईल याजकरिता अपण लौकर तयार होऊन यावे रा छ २४ सवान मो सावरखेडले [ नि* ] बहूत काये लिहिणे कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती

---

ले. ७२
माघ वद्य २ मंगळ.

श्री. गणराज

श. १६९० माघ वद्य २
इ. १७६९ फेब्रुवारी २१

वडिलाचें सेवेसी बालके कृतानेक सा नमस्कार विज्ञापना येथील कुशळ ता माघ वद्य २ मगलवार तिसरा प्रहर मुा पुणे वडिलांचे आसिर्वादे येथास्तीत आसे यानंतर वडिली आसीर्वाद शुध्य येकादसीचे पाठविलें ते वद्य १ सोमवारी पावोन साकल्य वर्तमान कलले शुक्रवारी द्वादसीस चादोरीस येणार राजश्री नाना फडणीस यांस सुज्यादवलाकडे जाण्याचा मजकूर पुसून लिा श्रीमंताचे लश्करास जावयास मार्ग न फुटला तर तिकडे जावें की काये जावेसे जाल्यास श्रीमंताची दोन पत्रें पृथ्वीपति सुज्याउदवलास पाठवणे म्हणून पत्री आज्ञा व श्रीमंतास येक पत्र की स्वामीपावेतो पोहचण्यास मार्ग न फुटे यास्तव तिकडे रवाना केले असे नानाचें पत्र पाठवणे म्हणून आज्ञा ऐसियासि वडिलाचे पत्र त्रितिये प्रहरी आले तेच समई श्रीमंताची पत्रे नवा रोजाची मुजरद दोन जासूद व शुतरस्वार येक आला देवगडचांद्याहून पांच कोसावर श्रीमंत आहेत फौज श्रीमंताची भारी आहे राजश्री जानोजी भोसले सडे वीस हजार फौजनसी आहेत त्याचे लस्करात श्रीमंताची... जासूद वगैरे होती त्यास भोसले मजकूर यानी वातनी श्रीमंतास पोहचू न देता छत्तीसगडाकडे बंगल्याचे सरहदेस होता तेथून निघून श्रीमंताची फौज तिकडेच टाकून साठ कोस आलीकडे देशाचे रोखे आला दरकूच देशास इकडे येऊन पुणे सातारे गंगथडी आदीकरून ज्याप्रमाणे नागपुराकडे जाले त्याप्रकारे करावें याउदेशे दरकूच येत आहे व करांडे वगैरे फौज बऱ्हाणपुराकडून जलगांव-जांबोदाकडे त्याची सडी आली आहे त्याजवरून श्रीमंताची आज्ञा आठा रोजात आली की पुणेयांतील लोकानीच त्या प्रांतीहून निघून किलोकिली जावें यास्तव कालपासून पुणियांत पळण आतिशये लागली आहे सरकारवाड्यांतून सर्व जिनस वगैरे काढून सिंहगडास कुल सरजाम रवाना जाला आज साइकाली श्रीमंत दादासाहेब व सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई पार्वतीबाई रमाबाई सर्व पुरंधरास जाणार सिंहगडचे भाडे मनास येईल ते जाले आहे उलकापात चहूंकडे जाला आहे तीन हिसे पुणियातील लोक गेले आहे आज उद्यांत येथे माणूस द्रिष्टस पडणार नाही याप्रकारे हंगामा आतिशये जाला आहे श्रीमंतही सडे होऊन मागे भोस-

त्याचे येतात गोपालराव गोविंद व रास्ते आगाडीस आहेत त्यांजमागे श्रीमंत आहेत श्रीमंतासमोर तो भोसल्याच्याने उभे राहावत ना[ही*] परंतु सांप्रत चूड हाती भोसल्याने घेऊन कजाखी आरंभून प्रांताचे निर्दाळण करावें या अर्थें इकडे आला आहे येथेही राजश्री नाना फडणीस यानी राजश्री गोविंदराव गायेकवाड नागोराम ज्यनार्दन राम आदीकरून चारपांच हजार स्वार व इस्केच हशम वगैरे जमाव आरंभिला आहे श्रीमंताचे प्रताप थोर आहे इयःपर भोसल्याचे पारपत्य येथास्थीत होत आहे परंतु ज्यनाचा भोग आहे तेथेही मातुश्री गोपिकाबाई व श्रीमंत नारायेणरायांस पत्रे त्रिंबकेस्वरचे किल्यास जाण्या...रवाना जालीत तेथे पावलियावर व...कळले आसेल वडिली सांप्रत कोठे जाण्याचा विचार न करावा चहूंकडूं[न*] याप्रकारे गर्दी त्यास सांप्रत घरी सर्वास सांभाळून आसावें तो आठा पंध्रा दिवसांत श्रीमंताचीच स्वारी भोसल्यामागे या प्रांती येईल मग आसपास आलियावर लस्करास जाण्याची सुभेथा पाहून तजवीज [करूं] सांप्रत बऱ्हाणपुराकडे आथवा कोठेही मार्ग चालत नाही आम्ही राजश्री नानापासी येका किल्यास राहावयाची चिठी मागितली आहे घेऊन पाठऊन देतो तो वडिली रामसेज इंद्राई हर्ष दोनतीन जागा आहेत त्यातून येखादे स्थळाची राजश्री नारो शंकर याजकडील कारभारी आस्तील त्याचे विचारे योजना करून परवानगी घेऊन ठेवावी न जाणो तिकडेच हेलवलांड जाली तर बहूत बहूत सावध आसले पाहिजे उटे वगैरे प्राथःकाली सेवेसी रवाना करून सडा मात्र येथे दोन चार दिवस राहून स्वार होऊन येतो आज्ञा देखील घेतली होती परंतु सांप्रत ही गलबल जाली [ अपूर्ण* ]

---

| | | | |
|---|---|---|---|
| ले. ७३<br>सु. ११७० जवल २३ | } | श्री | { श. १६९१ भाद्रपद वद्य ९<br>इ. १७६९ सप्टेंबर २४ |

अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री खंडो गणेश कादार पो नासिक गो यांसि

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुा सबैन मया व अलफ राजश्री देवराव माहादेव याची रवानगी सुजातदौला [ कडे ] वकिलीचे कामकाज सागून केली आहे...देणे व याचा यैवज सरकारात येणे आहे त्यास सावकार मारनिलेस तगादा करून जाणियास अडथला करतील व गेलियावर मारनिलेचे घरी कटकट करून गावखेडियास उपद्रव करितील तर तुम्ही त्यास निक्षूण ताकीद करणे की सरकारात मारनिलेचा यैवज आहे तो उगवलियावर तुमचे अैवजाचा निकाल करून देतील म्हणून सावकारास सागणे व जबरदस्ती करून सावकारानी माणसें बसविल्यास उठऊन देणे मारनिलेचे घरी व गावखेडियास येकदर उपद्रव लागो न देणे येविशी फिरोन बोभाट येऊ न देणे [ नि.* ] जाणिजे छ २३ जमादिलावल [ नि.* ] आज्ञा प्रमाण [ वा* ] लेखन । सिमा

---

ले. ७४ } श्री { श. १६९१ आश्विन शुद्ध ११
पौ जलर १० } { इ. १७६९ आक्टोबर ११

...जेन आपले स्वहस्ते करून च्यार प्रहर रात्री हरिकीर्तन केले त्या दिवशापासून श्रीने कृपा केली सीतज्वर गेला आता शरीरात बल नाही आठाचौ दिवसानी बल अलियावर लस्करास जाऊ आम्ही तर तैसेच सावकाश नवताही लस्करास जात होतो तो राजश्री रामचंद्र गणेश याचे पत्र आले की खीचीच्या मुलकात हवा उतम नाही पाऊ[स] फार डाग मोठीं प्रकृतीस मानणार नाही यास्तव आठ चार दिवस सिरोजेस राहून औषधउपाय करून सावकाश वाटलियावर येथून लिहून पाठऊ तेव्हा यावे त्या पत्रावरून येथे राहिलो श्रीवरद चतुर्थी येथे करून लस्कर वीस कोस राघोगड आहे तेथे जाऊ दोनशे राऊत लस्करातून आणविले आहेत रा रामचंद्र गणेशाचे पत्र मुजरद आले तेच तुम्हाकडे पाठविले आहे त्यावरून कळेल त्या उभयेताची ममता आपले ठाई बहूतच अहे श्रीकृपेने थोड्या दिवसात अरोग्य होऊन लस्करास जाऊ त्याची भेट जाल्यावर सविस्तर लिहू तुम्ही लिहिले की श्रीमंत स्वामीस पत्र लिहीत असावे त्यास प्रस्तूत आपला हा प्रकार विनंतीपत्र काये ल्याहावे लस्करास पावलियावर लिहू प्रस्तूत रा रामचंद्र गणेश खीचीच्या पारपत्यास लागले आहेत पुढें होईल ते लिहू श्रीकृपा करो हे असीर्वाद

पौ छ १० जमादिलाखर

---

ले. ७५ } { श. १६९१ माघ वद्य ४
पौ श. १६९१ माघ वद्य ४ } { इ. १७७० फेब्रुवारी १३

पौ माघ वद्य ४ मुा सिध्धटेक सके १६९१ (३ !)

विनंती विशेष येथे आल्यावर दोन तीन वेळ विनंति केली हकारनामक माघ मासी लग्नास येथे येणार त्या वेळेस काय होणे ते होईल यैसे जाहाले आहे वर्कड आज्ञेप्रो श्रीमंताची पत्रे [ना]नूरावजीस व विसाजी कृष्ण यांस घेतली आहेत व खासदस्तुरी पत्र नानास दिल्हे आहे ते पाठविले आहे पावेल गालीचे पसंद न पडले परंतु घेऊन ठेविले आहेत जर्दा घोडा आणविला आहे येथे पाठऊन द्यावा आला मर्जीस तर घेऊ यैसे बोलिले आहेत पाहिल्यावर घेणार नाही यैसे वाटते यास्तव जरूर पाठवावा स्मरण त्योणीच करून सांगितले यास्तव विनंती लिहिली असे पाठवावयाची आज्ञा करावी जे काये हरिपंत आल्यावर होणार त्याची चिंता न करावी खचित ग्रंथ ध्यानात अणून श्रीमतांनी ठेविला आहे चिंता नाही श्रीमंत रा दादा येथे बागात पांच सात दिवस होते येक दोन वेळ प्रसंग बागात जाऊन केला उतरही बरेच जाहाले लशकरात जाऊन फडशा लवकरच करितो यैसे बोलिले वर्कड सविस्तर मजकूर भेटीनंतर निवेदन करीन पत्री ल्याहावयाचे

नाही त्यास तेथील रंग पाहून प्रसंग सजोन मोरो हरीचे विद्यमाने फडशा उर्कून घेऊन मग येथे यावे दाहा पांच पडिले तर फाजिलापैकी द्यावे परंतु लढा न ठेवा येसी आज्ञा जाहाली आहे वर्कड सर्व मजकूर ठीक आहे कालजी किमपी न करावी यैवज यादवरावजीस द्यावा म्हणून आज्ञा त्यास येथे कोणी हुंडी घेऊन आल्यावर आज्ञेप्रो यैवज कोणाचे कर्ज काढून देतो चिंता न करावी मी आज्ञेखेरीज आहे यैसा अर्थ नाही वर्कड सर्व मजकूर स्वामीचे ध्यानातच आहे विशेष काय ल्याहावे भेटीनंतर साकल्य निवेदन होईल बहूत कार्ये लिहिणे लोभ कीजे हे विज्ञापना

---

ले. ७६ } श्रीवरद { श. १६९२ आश्विन वद्य ११
जखर २५ } { इ. १७७० आक्टोबर १५

तीर्थस्वरूप महाराज रा [ मो. जा.* ] नानासाहेब वडिलाचे सेवेसी

बालके बाजीरायाने चरनावर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना यैसी जे येथील क्षेम ता छ २५ माहे जमादिलाखर मुा बंगला जाणेंन वडिली आपले कुशळ हरघडी लिहिती आज्ञा केली पाहिजे विशेष पेशजी पत्र बमै रा बालाबाचे पत्रासहीत पुन्यातून हरकारा आला होता त्या समागमे पा पावले असतील त्याजवरून वर्तमान विदीत जालेच असेल हाली नवा[ब] वजिराचे येथे वर्तमान आले की रा पाटीलबानी परसतान ठेविले की प्रथवीपतीस नेयावे व श्रीमत रा विसाजीपत दादांनीही परसतान ठेविले पूल तर येमुनेचा राजघाटावर तैयार जाला एका दोन दिवसानी उतरनार होते त्यास रा सुबेदारानी सागून पाठविले की पित्रपक्षाचे पाचच्यार दिवस राहिले आहेत हे दिवस जाले म्हणजे यमुना उ[त*]रून प्रथवीपतीकडे चालावे याजवर काही वर्तमान आले नाही की चालले अथवा हे घे...लियावर चालतील जाबतेखानाचा वकील मेघराजाचा पुत्र प्रथवीपतीकडे आला त्यानी मुलाजमत केली हिसामुदीखानाचे मार्फतीनें येकशे येक मोहर नजर केली रा गणेशपताचे मारफत जाबसाल करितो व हाफिजाकडील उबेदुलाखान व टेगचंद मुनसी आला आहे प्रथवीपतीचे लश्करात त्यास त्याचीही [वि]दा जाली चीरा सरबस्ता हाफिजास इनायेत जाले गेले असतील व ते हे करार करून गेले आहेत की दाहा दिवसानी हाफिजास घेऊन येतो व प्रथवीपतीही बालले आहेत की लवकर घेऊन येणें तो परियेंत मीही येथेच आहे दाहा दिवसानंतर राहणार नाही प्रथवीपती फरकाबादे[हून कूच]करून नबीगजास गेलेत तेथेच मुकाम आहेत मुजफरजगची मामलत जाली कुचाचे दिवसी ते भेटीस आले होते त्यास चिरा सरबस्ता मुख्यास जाला व च्यार सर्दार त्याचे समागमे होते च्यार खिलत त्याला दिघले व रुकस्त केले खान तर प्रथवीपतीचे लस्करास गेलेत त्याचे वर्तमान तर पेशजी वडिलास विनंती केलीच होती व तिकडे रा बालाबास लिहिलेच आहे नवाबानी दोनदा खानापुढेच वडिलाचे

स्मर्ण केले की ते असते तर त्याला व राजेजीस पाठविता तुमचे तर काही कामही नवेते बरे जे व...येतील ते व्यापादून घेऊन आता तुम्ही...

---

ले. ७७ श्री श. १६९२ मार्गशीर्ष वद्य १२
सु. ११७१ साबान २५ इ. १७७० डिसेंबर १३

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री बापूजी माहादेव व देवराव माहादेव स्वामी गोसावी यांसी

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष नाशकातून तुमचे कागदपत्र रुमाल आणविले होते त्यांस समई उपयोगी कागद तेथे असतील ते घेऊन तुम्ही येणे मागे कागद राहिला असें म्हणावयास कार्यास येणार नाही याप्रो हिसेब वगैरे कागदपत्र घेऊन जलद येणे जाणिजे छ २५ साबान सुा इहिदे सबैन मया व अलफ [ नि.* ] बहूत काय लिहिणे हे विनंती

पो छ ३० माहे साबान उर्फ पौष शुध १

---

ले. ७८ श्रीवरद श. १६९२ माघ शुद्ध १० सुमार
इ. १७७१ जानेवारी २६ सुमार

विनंती उपर पूर्वी तुम्हास लिहिले की बालाजीस सागणे की रा विसाजीपंतासीं अम्ही विचार केला श्री गंगापारचा मुळूक बंगशाचा अहे तो त्यास द्यावा व त्यास अपले शामील करावे ते त्यानी मान्य केले तुम्हास व बकसीस पत्र लिहिले परतु उतर न अले दुसरें त्याचा प्रांत रा माहादजी सिंदे याचे विद्यमाने अंतरवेदीतील सोडवून घेतला तो प्रांत त्यांचे रजामंदीने सिंदे यानी सोडऊन घेतला अम्ही म्हणतो की दगाबाजीने त्याजला इतबार देऊन त्याचा दस्तावेज घेऊन आपणच त्याचा कौलनामा लिहून दिधला त्यानी कोरीच फर्द मोहर करून दिधली त्यानी मनमाने ते लिहून तुम्हास अणवून दाखविले व लटके तें खरे केलें अता तुम्ही प्रांत त्याचा त्यास द्याल तर काही नजरही देतील त्याचे उतर अम्हास विसाजीपंत म्हणाले की जर काही सिंदे यानी दस्तावेज नवाब अहमदखानास दिधला असेल तर त्या दस्तावेजाने त्यास लाजवाब करून या कामास जटके देईन बेदस्तावेज कसे बोलावे त्यांत पहिले दिवसापासून त्यांचा डौल अम्हाकडे नाही यास्तव दस्तावेज पाहिजे नाहीतर जे करणे ते अम्हींच करावयास धणीच अहो अता दस्तावेजाखेरीज सिंदे यास कसे लाजवाब करावे यास्तव काही दस्तावेज माहादजी सिंदे याचा असेल तो अणवणे म्हणून सागितले जर बकशीची मरजी असली की सिंदे यास हे वृत न कळावे तर त्यांस कळू न देता

२६७

यांची खातरजमा करून देऊ की शिंदे यानी करार केला असतां तुम्ही न कराल तर अम्ही पुणियास ये गोस्टीस नेऊन तेथून हे काम करून येऊ याकरिता तुम्हास पूर्वी लिहिले परंतु उतर न अले हाली जरूर दोन येक च्यार दस्तावेज सिंदे याची पत्रे अथवा कौलनामा प्रांत सोडावयाचा असेल तो घेऊन तुम्हीच येणे वकर्शीस लिहिले अहे की शिवरामपंतास पो तेही तुम्हास अज्ञा देतील तर तुम्ही सविस्तर वृत येकांती सागून सत्वर तो दस्तावेज घेऊन येणे माहादजी शिंदे यास हा मजकूर सहसा येथे उमजणार नाही चिंता न करणे म्हणून सागणे कलेल तर पुणियास कलेल इकडे जोवर अहेत तोवर येक अक्षर कलू देणार नाही ये विशई शपथपूर्वक त्यांची खातरजमा करणे अहात त्याचे घर बुडविले वास्तव अम्हास हलहल वाटून तरतूद केली अहे व करितो त्याचे दैवे होईल ते खरे व बनेल तेथवर करून घेतो नजर त्या प्रांताची शिंद्यासी काये मान्य केली होती ते सविस्तर लिहून घेऊन येणे वजिनस दस्तावेज द्यावयास त्याचे चितास नच ये तर नकला घेऊन येणे व असल दस्तावेज कौलनामा अथवा पत्रे असतील त्याचे मातवर समागमे घेऊन येणे विलंब क्षणाचा न करणे श्रीच कृपा करो भेट होये तो सुदीन हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ७९<br>रजब १० | श्रीवरद | श. १६९३ आश्विन शुद्ध ११<br>इ. १७७१ आक्टोबर १९ |

श्रियासह चिरंजीव राजश्री तात्यासाहेब यांस प्रति पुरुषोत्तम माहादेव कृतानेक असीर्वाद उपरी येथील कुशल ता। १० माहे रजब मु॥ लस्कर नजीक कोल जाणौन स्वकीये लिहीत असिले पो विशेष तुम्हाकडील कासीदजोडी नाहर मिर्धा याचे मार्फातीची श्रावण शुध्ध ९ नवमी पुण्याचे मुकामीची पत्रे सरकारची व आपली पाठविली ते येथे छ १९ जोखरी मु॥ मजकुरी खुर्जाचा गढ घेऊन रामगडापासी आले आहेत जाटाचे मुलकात जसी केली तिन्ही सरदाराचे कमाविसदार जागाबजागा बसले पेढारी मूलूक जालितात लुटितात येथील प्रकार काहीच ठीक नाही तिघाच्या तीन वाटा आहेत आमचा प्रकार अद्याप प्रथमच दिवस आहे खर्चाची तडातोड बहूत हे तिघेही काडीमात्र खबर घेत नाहीत खर्च भारी काये करावे याउपरी श्रीमंत स्वामीस विनंतीपत्रे पाठविली आहेत त्याच्या नकला करून तुम्हास तात्पर्य कलावयासाठी पाठविले आहे तर वाचोन समजौन जेथे सांगावयाचे असेल तेथेंच सांगावे मागाहून होईल ते सविस्तर लिहू [ नि.* ] श्रीच कृपा करो विशेष काये लि॥ सिंदे होलकर अंतस्थ येकचित अहेत परंतु बाह्यात विसाजीपंतांसी अहवृधी बोलतात येक दादोपंताकरिता दोघेही सरदार खटे अहे याजला त्याजवाचून काहीही कारभार करणेच नाही वजिराची व फरुखाबादेची पत्रे येऊन दीड महिना जाला उतरच न मिलेत याचे कारण

कारात परभारेही येवज पावेल तर उतम अहे का की त्रिकुटांत येक मत नाही व तेथे जैपुरांत फूट कारभारियात जाली अहे सरकारातून तुम्ही श्रीमत बापूस विनती करून हजार पाचसे राऊत निसवतीस घेऊन येणे सदासिवभट जैपूरचे राज्याचा गुरु व प्रतापसिंग वगैरे रजपूत वीस हजार माणूस येकत्र येकचित जाले अहे व येक माहोत राज्याचे मातुश्रीने कारभारी केला व राज्याचा मामा उदेपूरकर अहे त्याजला राजा लेकरू जवल घेऊन असतो यास्तव रजपूत राज्यास रामराम न करीत माहोतास रुजू न होत राजा येकला असिल्यास रजपूत रामरामास येतात त्या सर्व रजपुतानी समापत्र करून सदासिवभटास राजी होऊन येथे वकील पाठविला अहे की दोन हजार स्वार अपला पो अम्ही माहोतास कैद करून च्यार लक्ष रुा नगद देतो बाकीची वाट करितो म्हणतात परंतु येथील प्रकार भास्करपंताचे लिहिल्यावरून कलेल जयनगरी लाख माणूस मिलोन राज्याचे मामाचे घर शहरात लुटिले येकले जिवाने राज्याचे महलात पलोन गेला तेथे वाचला माहात कारभारी अहेत ते म्हणतात की रजपुतांचे पारपत्य करणे आम्ही रुा देतो त्यास रजपुताचे पारपत्य करावयासी वीस पचवीस हजार फौज पो हे काम दो हजाराचे नावाने वे जोखो होते तैसेच फरुखाबादचेही अहे परतु दादो मल्हार सरदार असते तर खुद बखितयारीने करते अता गरिबाची श्री अहे श्रीच कृपा करो

---

ले. ८० पो मार्गशीर्ष शुद्ध ९ } श्रीवरद { श. १६९३ मार्गशीर्ष शुद्ध ९ इ. १७७१ डिसेंबर १५

पुा चिरंजीव साहेबास असीर्वाद उपरी पातशाहाचे मानस की चालीस लक्ष रुये घेऊन आम्हासाठी दिली वगैर प्रांत सोडिला जाबतेखानाचा जो प्रांत आहे त्यांत अमल पुर्ता करून न दिधला श्रीगंगापारचा प्रांत त्याजला सोडिला आता इकडीलही प्रांत त्याजलाच देणे म्हणता तेव्हां रुये सरदारापासी शामील जाल्याचेच मात्र घ्यावे वरकड स्वार्थ काये जाला कडा कुरा व मेरठ वगेर यैवजाचे तनख्यांत पूर्वी दिधले होते ते जागीरच देणे म्हणतां हा कोठील न्याये आहे अैसेही असता मेरठ वगैर जागीरीची सनद दिली...कड जाटाचा प्रांत घेऊन पातशाही बंदोबस्त करून द्यावा रोहिल्यास मारिले त्यांजलाही खारीज करून निमे प्रांत घेणे सलाह होती जे जागा आमलात आमचे आहे तेच सोडणे हे कैसें बोलता व हाफीज रहमताचे विद्यमाने रोहिल्याचा मामला ठैरला त्याप्रो त्यांपासून किस्तबंदीचा यैवज अजवर काये घेतला जबरदस्ती पातशाहावरच करावी की काये हे मानस पातशाहाकडील आहे पुढे ठैरल ते मागाहून लिहू निमेनिम हिसा पातशाहास देण्याची वाटणी हरयेक संवस्थानिकाचे अैवजाचे भरण्यापैकी हिशोब घेऊन येऊन सरकारचे अैवजाचा भरणा पातशाहाचा जाला म्हणून दिलीतून

दादोपंत घेऊन रा विसाजीपंतास समजावितील ते मागाहून तुम्हास लिहू श्री अमचे अहे सदैव कुशल वृत लिो हर पुर्वणीत श्री अमची लिहिणे विशेष चिंतेचे कारण अहे चिंता न करावी विश्वंभर अहे सदैव कुशल वृत लिो भेट होये तो सुदीन हे अनेक असीर्वाद

पौ मार्गेस्वर शुध ९

---

ले. ८१ सवाल २४ } श्रीशकर { श. १६९३ पौष वद्य ११ इ. १७७२ जानेवारी ३०

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री रघुनाथराव स्वामीचे सेवेसी

पो रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष तुम्हांस पातशाहाचा निरोप राजश्री पुरुषोतमपंत नाना याणी घेऊन दिल्हा असतां तुम्ही येथून लिहिल्याप्रो रोहिल्याकडे जात नाही व इकडेही येत नाहीं व त्याच्या विचारांत राहात नाहीं म्हणून मारनिलेनी लिहिलें त्याजवरून कलले यैशास तुम्हांस पेशजी येथून लिो होते कीं तुम्हीं रोहिले याजकडें वगैरें थैल्या पाठविल्या आहेत त्याजकडे जाणें म्हणून त्याप्रो करणें इकडें पाठवावयाचा अग्रह नवाबाचा असला तरी येणे नसल्यास पुरुषोतमपंत नाना आपणाकडील कोणी त्रिंबकदास याच्यावा देऊन पाठवितील तुम्हीं केवल दुराग्रहास प्रवर्तून तेथे राहू म्हणाल तरी न राहणें याउपरी तुमचा वो( वो) भाट मारनिलेनी लिहिला तरी उतम नाही ते आपले रजावंदीनें तुम्हांस राहून घेतील आणि तुम्हीं त्याच्या विचारांत वर्ताल तरी उतम राहून नालेश न ये ते करणें तुम्ही तेथे न राहावे हे उतम आहे काय तुम्हाजवल पातशाहाच्या व नवाबाच्या बोलण्याचा सिलसिला असल तों मारनिलेस माहीत करून देणें रा छ २४ [ नि* ] सवाल बहूत काये लिहिणें लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती

---

ले. ८२ सु. ११७२ जिल्हेज २२ } श्री नकल { श. १६९३ फाल्गून वद्य ९ इ. १७७२ मार्च २७

राजश्री माहादजी सिंदे गोसावी यांसि

द सकल गुणालंकरण अखडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] स्नो माधवराव बलाल प्रधान असीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष राजश्री पुरुषोत्तम माहादेव वकील यांचे दिमतीस स्वार ५०

नास करार करून दर राउतीं रुये २०० दोनसे प्रमाणे सालीना तैनात करून
ालबंदी रोजमरा सदरहू तैनातपौ सिरस्तेप्रमाणे द्यावयाविसी सन समान सितैनात
ानद दिल्ही आहे त्याप्रमार्णे चालत आहे त्यास मशारनिले हिदुस्थानचे स्वारीस
ारकार चाकरीवरी आहेत यास्तव यांचा यैवज पेशजीचे सनदेप्रमाणे झाडून
ावता करीत जाणें याचा बोभाट न ये ते गोष्ट करावी जाणिजे छ २२ जिल्हेज
ुा इसने सबैन मया व आलफ बहूत काये लिहिणे हे असीर्वाद

---

| | | |
|---|---|---|
| े. ८३ सु. ११७३<br>ावल १० [ अव्वल साल ] | श्री | श. १६९४ ज्येष्ठ शुद्ध १२<br>इ. १७७२ जून १२ |

पुा राजश्री पुरुषोतम माहादेव गोसावी यांसि •

उपरी छ १० सफरी वजिरानी रामघाटीहून कूच करून अनूपशहराकडें च्यार कोस गेले फिरंगी त्याजपुढें दोन कोस आहे सादतअली वजिराचा पुत्र काही फौजेने करनेल चांदसाहेब दिलीस येऊन पातशाहास सर्वा पातशाहाजादियांस प्रयागास घेऊन येणार दुसरा विचार पातशाहास आगरियांस आणून आगरियाचा किला [ध्या]वा यैसे आहे यात घडेल ते लिहून पाठऊन म्हणोन लिहिले ते कललें या उपरीही तिकडील येईल वर्तमान ते लिहिणे [नि*] जाणिजे छ १० रालौवल सुा सलास सबैन मया व अलफ [नि*] बहूत काये लिहिणे [वा*] लेखन। सीमा

---

| | | |
|---|---|---|
| ले. ८४ | श्रीगणराज | श. १६९५ चैत्र वद्य २<br>इ. १७७३ एप्रिल ९ |

पुा तीर्थस्वरुप राजश्री नानासाहेब वडिलांचे सेवेसी

विज्ञापना श्रीमंत राजश्री [ मो. बा.* ] रावसाहेब व श्रीमंत सखारामपंत बापू व नाना फडणीस आदीकरून सर्व मडली फालगुण वद्य दशमीस गंगापुरास दाखल जाले मातुश्री बाईसाहेबाच्या भेटी होऊन वीस रोज गंगापुरी राहून चैत्र शुद्ध १५ पौर्णिमेस मातुश्रीची आज्ञा घेऊन पुणियासि स्वार होऊन गेले श्रीमंतास व मुतसदी मडलीस घरास आणिले वस्त्रे वगैरे दिघली राजश्री नाना फडणीस हरिपंत तात्या वगैरे भोज्यनासही आले होते श्रीमंतास वस्त्रे वगैरे दिघली श्रुत होये वैशाख मासी पुणियास जाऊं तेथील वर्तमान होईल ते साकल्य लिहू पुणियासि स्वारी गेलियावर सरजाम्याकडील कर्जपटी वसूल करून फाजिलाचा निकाल पाडतील कुल येख्तियार श्रीमंत बापूकडे आहे श्रुत होये नवाब गाजुदीखान पुणियासि आले श्रीमंत उभैथा कोसभर सामोरा जाऊन घेऊन मुजफरजंगाचे

वाडिआंत राहावयासि स्थळ दिघले दोनदा मेजमानी केली हती घोडा वस्त्र जवाहीर पांचा हजाराचे दिघले नवाबानी डे...न मेजमानी काळानरूप केली भुभुक्षितच ...त आले होते तिकडील पातशाहातचा बंदोबस्त करावा विजारत आपण करावी द्रव्य विशेष पद प्राप्त जालियावर निशा करावी आबदाली बोलावीत अस्तां न गेलो पातशाहा शाहआलम यानी बोलावीत आस्ता तिकडेही न गेलो तुमचे श्नेहास्तव धाऊन आलो म्हणून बहुत बोलले परतु येथे त्याचे बोलणे सर्वथा प्रमाण व उपयोगी आज पडावेसें काहीच नाही व लबाड बोलणे जीव नाहीसे ठेराविले मातबर माणूस निजामनमुलकाचा नातू घरास आला याचे मानमहत्वांत आंतर न करावें व उपासी मरतो भक्षावयासि नाही यास्तव आला आहे याचे पोटाची मात्र वेगमी करून द्यावी या आर्थे सर्वानी साहित्य करून राजश्री बालाजी गोविंद याचे प्रांतात बुधेलखंडांत दोन लक्षाची जागीर दिघली ते भक्षून राज्यास आभीष्ट चिंतन करून का[ही साक्षे]प करावा फितवा फांदडा करू नये सरकारचे ल[क्षा]त आसावें तर जागीर चालेल याप्रमाणे बोलणे जाले त्यांचा आग्रह पुणियास राहावें ऐसे फार परतु निजाम आलीखानाची पत्रे दोन चार आली की आमचा तुमचा श्नेह कौलकरार जाला आस्तां आमचे शुत्रूस तुम्ही आणून ठेविले आहे त्याजवरून नवाबाची रवानगी बुधेलखंड प्रांती सरजाम नेमिला त्याचा आमल करून देऊन त्या प्रांती राहावें यास्तव कारकून समागमे सरकारचा व लोक पोंहचावयासि दिघले नवाबासमागमें कारभारी आपल्यापासी मुख्य खिजमतगर होता त्याजला किताब लाला सुखलाल देऊन ठेविले आहे व जलालुदीखानाचा भाचा ऐसे ठेविले आहेत ते दरबारी बोलत पुणियांत नवाबानी वाण्याची वगैरे उचापत खादली त्यानी आडविले मग पस्तीस हजार रुपये जागीरीचे येवजी सरकारातून कर्ज देऊन रुकसत नवाब आसफज्या बाहादर जाले ते आद्यापी संगमावर डेरे दाखलच आहेत समागमे बारबरदारी…त्याचे आहेत चालीस पनास घोडे केवल गळाली आहेत मार्गाचा निर्वाह काळगतीनरूप दोंचौ महिन्या जागीरीनजीक दाखल होती[ल]… शुक्र ईश्वरापासी करतील तो सुदीन आंताजी माणकेश्वराचे चिरंजीवाची सिपारस नवाबानी जाते दिवसी बहुत केली त्यास नवाबच आपले पोटासाठी हजार कोस आले तेथे सिपारस कलतच आहे हे विज्ञति

---

| | | |
|---|---|---|
| ले. ८५.<br>चैत्र वद्य २ | श्री गणराज | श. १६९५ चैत्र वद्य २<br>इ. १७७३ एप्रिल ९ |

तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेब वडिलांचे सेवेसी

बालके दिवाकराने कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता चैत्र वद्य २ मुकाम ज्यनस्था[न] वडिलांचे आसीर्वादे येथास्थीत आसे

यानंतर वडिलाकडील आसीर्वादपत्रे तीन येक दिलीहून कूच जाल्याचे दुसरे अंतरवेदीतील तिसरे रामघाट भागीरथीतीरचे आले त्यापैकी दोन पत्र दीढ दोन दोन महिन्यानी...याहून फिरत फिरत आली ती व येक पत्र रामघाटचे मुकामचे आजुरदार सविसा रोजानी येथे पाठविली ती पावली पत्रे श्रीमंत स्वामीस गंगापूरचे मुकामी गुजराणिली येली पाठविली ती गुजराणिली उतरे सत्वरच सेवेसी पावती होतील उतर व्हावयासी दिवस बहूत लागतात दरबारचे मर्जीनरूप उतर जालियावर पावते त्यांत च्यार महिने मी नासिकास आहे यास्तव दिवस अधिकच लागले इथःपर चैत्र अगर वैशाख शुध्धांत आम्ही पुणियासी सुमूहूर्ते जातो मग उतरे यावयासि दिसगत लागणार नाही सत्वर पावतील वडिली तिकडील वर्तमान तपसिले लिहिले ते साकल्य श्रीमंताचे व श्रीमंत राजश्री...चे ध्यानास आले त्यास येथील आज्ञा वारंवार देच ना... तिकडील मसलत सामदामे आटोपून देशास येणे लोकांस बहूत दिवस ाले त्याप्रमाणे तिकडेही करतील सरकार आज्ञा प्रमाण करून आखर साली फिरील श्रीमंत स्वामीचा प्रताप थोर आहे श्रीकृपेने फिरंगी व आयुघेकर आविंधाचे ारपत्य जालेच आसेल आथवा होईल सलूख होऊन द्रव्यलाभ विशेष होऊन ौज तार्जी व सरकारांत खजाना सरदार आणितील तो सुदीन वडिली राजश्री वेसाजीपंत दादाची मर्जी व सर्वासी श्रेहममता दिवसे दिवस वृध्धीस पावऊन यांजसमागमे यावें की येथे सर्व मडली शुक्रगुजारी करून श्रीमंताचे मनात कारभारियाचे मनात याद सेवेची उत्पन्न होऊन कांही...होऊन बंदोबस्त येथास्थित घडे इथःपर सरदार त्या प्रांती बहूत दिवस राहात नाहीत सत्वरचं फिरील कां की फौजेस पांच वर्षे जाली सिवाजी वि[ठ्ठ]ल देशाकडे आले राहिले यांची दुचित्ते जाली नाकावर जीव आले इतके फिरोन द्रव्यदर्शन नाही पोट पुरते भरणे संकट जाले यास्तव फिरतीलच थोडक्या दिवसासाठी वडिली तिकडू[न] येणियाची जलदी करू नये सरदारासमागमेच यावें दरबारी राजश्री विसाजीपंत दादांची पत्रे येयात त्यात हर पत्री वडिलांची तारीफ लिहितात म्हणून राजश्री बापू बोलत होते व नाना फडणीस हरिपंत तात्यांनी सांगितले त्यास तेथे तो आद्याप बंदोबस्त कांहीच केला नाही याजवरून त्यांची ममता आपले ठाई पूर्ण यांत संवशये नाही तेथील पेंचामुले प्रसंगोचित पाहून फिरतेसमई आथवा येथे आल्यावर बंदोबस्त करून देतील कां की त्याचे मनात शुध्धता नस्ती तर तारीफ दरबारी व राजश्री विठलपंत तात्याचे पत्री न लिहिते त्यास वडिली मेहनतही त्यांजसमागमे बहूत केली आतां थोडक्या दिवसासांठी त्याची मर्जी दिवसे दिवस व घरोबा विशेष संपादन करून फिरतेसमई येथास्थीत काळानरूप काळक्षेप चालेसा बंदोबस्त करून देऊन ठेविले व संवस्थानिकाकडील व बुदेलखंड प्रातीचा सरंजाम वगैरे बंदोबस्त करून ज...तिकडे कायम करून दिघली तर बंदोबस्त

करून घ्यावा व राहावें नाहीतर तिकडे कारकून त्याचे मर्जीनरूप ठेऊन देशास यावें येथे श्रीकृपेने वडिली मेहनत श्रम केले याचे आर्थ श्रीमंताचे मनी ईश्वर प्रेरक होऊन सर्वांची आंत:करणे द्रऊन कार्य होईल इथ:पर श्रमाची व उद्योगाची बाकी राहिली नाही आसो राजश्री दादा मात्र येश संपादन करून देशास आले म्हणजे त्याचेच हाते आपले कार्ये होईल चिंता न करावी व राजश्री दादा तिकडे बंदोवस्त करून त्यांचे संतोषे देतील तो घ्यावा ति:केच सुटले पुढे रदबदलीस जागा ठेवावी तेही तेच करून देतील येकदांच आवचे करून घेईन म्हणल्यास येथे तेथे सर्वास भारी वाटेल... काहीच नाही व चितास विष्कलीत वाटेल यास्तव जित्के तेथे त्यांचे संतोषे होईल तेथे ते करून कागदपत्रे रोख होईल तें पदरी पाडून घ्यावें वोढू नये बाकी राहिले ते येथे होईल त्याप्रमाणे करून घ्यावें दरबारचा रंगसमये सर्व वडिलाचे ध्यानात आहे आपल्यास मुरबी कृपाळू सर्व येकनिष्ट श्रीमंताचे चरणी द्रढ याच गोष्टीने सर्वाचे न्हदई प्रेरक परमात्मा होऊन लज्या रक्षील चिंता न करावी त्याचे मनोधारणेच कार्ये होईल ते करून घ्यावे बाकी राहिले तें इकडे आलियावर येथून करून घेऊ तात्पर्ये तेथे दर माहा वगैरे व सवस्थानी काम‥बंदोबस्त करून च्यार सवस्थाने नेमून आपल्याकडे घ्यावी त्यानी तिकडे राहावयाचाच अग्रह केला व सोये कालक्षेपानरूप आसली तर राहावे इकडे यावयाची मर्जी बहूतच जाली तर मजला लिहून पाठवावें मी तिकडे येईन वडिली देशास यावें कारकून तिकडे ठेऊन आपण यावें दादाचे विचार जाले तर तैसे करून यावें परंतु च्यार संवस्थाने आपले लगामी व २ व ६ रोजमरा दर माहा व संवस्थानिकाकडील काळानरूप सुटेल तित्केच हाताखाली घालावें आवघे येकदांच होणे कठीण व तेथे जित्का निकाल घडेल तित्का पाडावा पूर्वीही विनंती लिहिलीच आहे तेथील प्रसंगानरूप करणे तें वडील करतील मुख्य दादाचे मनोधरण व आसंमत वडिलीचे‥ व उभैथा सरदारांचे मनोधरण रक्षावें आखर फिरत्या स्वारीस आपले बहूत शुक्रगुजारी दरबारात करीत व उपयोगी पुढें पडे तसे वडिली करून ठेविलेच आहे व दिवसेदिवस विशेष करावे इथ:पर श्रीकृपा करील चिंता तिळतुल्य न करावी श्रमाची सीमा जाली विशेष काये लिहिणे चरणदर्शनलाभ होये तो सुदीन कृपा केली पो हे विज्ञापना

---

| | | |
|---|---|---|
| ले. ८६<br>सु. ११७६ मोहरम २२ | श्री गणराज | श. १६९७ फाल्गुन वद्य ८<br>इ. १७७६ मार्च १३ |

यादी कलमे राजश्री [मो. जा.*] पाटीलबाहेब यांजपासून करार करून घेणे सुा सीत सबैन मया व आलफ

आपणावर व होळकरावर वरात श्रीमंतानी रुपये २८२२१ आठावीस हजार दोनसे येकवीस रुपयाची दिघली त्यास आपण प्रिथ्वीसिंग जैनगरकर राजे यांजवर वरात दिघली आहे त्यास ताकीद करून जोर पोंहचाऊन अैवज वसूल करून घ्यावा नाही तर दुसरे ठिकाणी नख्त अैवज कृपा करून द्यावा हिदुस्थानाकडे स्वारी चालल्यावर हर येक जागा द्यावा की नख्त पदरी पडे कलम १

हिंदुस्थानात स्वारी आल्यावरी ताकीद करून यैवज देविला जाईल

पूर्वीपासून आम्ही आपले पदरचे त्यास हिंदुस्थान प्रातीचे वकालतीचे कामकाज मामलती रुजू होतील त्याचे आमचे हाते घ्यावे दुसरियाचे हाते न घ्यावे आम्ही चाकरी करूं पहिलेही आपलेच घरापासून आमची स्थापना आहे त्याप्रमाणे काम घ्यावे कृपा करावी कलम १

सरकार उपयोगी चाकरी तुम्ही केल्यास तुमचेच हते कामकाज वकिलीचे घेतले जाईल

श्रीमंतानी राजश्री बालाजी गोविंद यांजवर प्रांत बुंधेलखंड येथील खेडी तैंनातपैकी रुपये २०००० वीस हजार रुपयाची सनद दिघली आहे व आपणासही आमल बसऊन देण्याविषई पत्र आहे त्यास ताकीद करून खेडी चांगली वसुली नेमून आमल बसऊन द्यावा निक्षूण ताकीद करावी कलम १

बालाजी गोविंद यासी ताकीद गांवा विसी केली जाईल

सरकार श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] पंतप्रधान यांच्या वरात केहरीसिंग जाटावर रुा ४८२२१ आठेतालीस हजार दोनसे येकवीस रुपयाच्या आहेत त्या आपली स्वारी हिंदुस्थानाकडे चालली म्हणजे जाटास ताकीद करून जोर पोंहचऊन रुपये त्याची मामलत होईल त्यातून नख्त आमचे पदरी घालावे कलम १

सरकारचे वरातेप्रो जाटास ताकीद स्वारी हिंदुस्तानात गेल्यावरी करून यैवज देविला जाईल

पन्नास रावताचे बोलीची सनद दरसाल रुपये १०००० दाहा हजाराची आपले नावे इा छ १ जिलकाद सुा समान सितैनापासून आहे त्याची सनद श्रीमंताचे सरकारची आहे रुपये पावत नाहीत त्यास इा ता हिसेब करून स्वारी हिदुस्थान प्रांती गेल्यावर हर येक जागा ऐवज देवावा की पदरी पडे व देवराव माहादेव याची नेमणूक सरकार श्रीमंतापासून आपले नावे दरमाहा रुपये ५०० पांचसे इा छ १७ मोहरम सुा इसने सितैनापासून आहे त्याचा अैवज इा ता हिसेब करून हरयेक जागा यैवज दोन्ही देवावे की नख्त पदरी पडेत कलम १

स्वाराची व दरमाहेची नेमणूक सरकारातून आम्हावरी आहे त्यास सरकार हिसेबी आम्हास मजरा पडल्यास तुम्हास हर येक जागा हिदुस्तानात यैवज लाऊन दिल्हा जाईल

येकूण पांच कलमे सदरहू लिहिल्याप्रमाणें करार
छ २२ मोहरम सु॥ सीत सबैन मया व आलफ मु॥ उजैन

---

ले. ८७ | श्रीवरद | श. १७०० फाल्गुन शुद्ध ८
सफर ८ | | इ. १७७९ फेब्रुवारी २४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पो पुरुषोतम माहादेव कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। छ ७ माहे सफर मुकाम नजीक जैपूर लस्कर पातशा जाणून स्वानंद लेखन करीत आसिले पाहिजे विशेष इकडील सविस्तर पेशजी छ २२ मोहरमी पत्रे पाट[विली] आहेत ते पाऊन श्रुत जालेच असेल हाली सविस्तर श्रीमंत राजश्री सुबेदारसाहेबाचे पत्री लिहिले आहे त्यावरून ध्यानास येईल देसी इंग्रजाचे पारपत्य जाले हे वर्तमान पातशा व नबाब आबदुल आहादखान यानी औकून बहूत संतोष मानून खलिता पत्रे शुका श्रीमंतास पाठविला आहे त्याजवरून कळू येईल [आपले] आगमनाची मार्गप्रतीक्षा बहूत आहे ई[श्व]र घडवील तो सुदीन [नि*] भेट घडे ते सुघडी सदैव पत्रामृती लोभ केला पा। हे विनंती

---

ले. ८८ | श्रीवरद | श. १७०२ फाल्गुन वद्य ८
रावल २१ | | इ. १७८१ मार्च १७

मसोदा आपल्यास श्रुत कलावे म्हणून पाठविला आसे
श्रीमंत राजश्री पाटीलसाहेब गोसावी यांसी

दं आो पुरुषोतम माहादेव कृतानेक आसीरवाद विनंती येथील कुशल ता। छ २१ माहे रबिलवल मुकाम दिली जाणून स्वानंद लेखन करीत आसावे विशेष छ २९ जिल्हेजचे पत्र पाठविले ते छ १२ सफरी पावले पत्री आज्ञा कीं इंग्रेजाचा कारभार दगाबाज हा प्रसिधच आहे इंग्रेजाचे वकिलास तोडीं न लावितां त्यास निरोप दिल्हा हे उतम केले इंग्रेजाचे पारपत्य करणे निश्चये यांत गुंता नाही इंग्रेजाचा फैलाव जाल्याने सर्वास वाईट आहे हैदरखानानी आरकाट घेऊन चिनापटनाकडे तान बसविला औसेच बहूकडून तान इंग्रेजास बसवावा हे उतम सुरत मुमईकर सारे येकत्र वसईनजीक जाले त्यास इकडील सर्वांची मजबूती पकी आहे वसईचे उपराल्यास श्रीमंताची फौज पंचेवीसतीस हजार व तोफखाना कोकणात गेला आहे त्याचे तोंडावर च्यारपांच पलटणे आली होतीं त्यासी व सरकारचे फौजसी लढाई जाली पलटणे मोडली पलटणातील सरदार दोघे मारले पडले वरकड पळून कल्याणास गेले त्याचे मागे फौजा जाऊन घेरले आहेत मागाहून राजश्री हरिपंत फडके व रामचंद्र गणेश

फौजसुधा कोकणात गेले राजश्री बालाजीपंत नाना बोरघाटावर फौजसुधा आहेत याप्रमाणे तिकडेही तान बसऊन इंग्रेजाची रसद बंद केली आहे खानदेशांत दोन तीन पलटणे कोडाईब्रारीकडे आली त्याजवर गणेश विश्वनाथ बाहेर आहेत इकडून...तुकोजी होलकरही सेदव्याचे घाटाने उतरोन कोडाईब्रारीचे सुमारे गेले त्या पलटणाचे पारपत्य होईल व सिपरीवर सा पलटणे आली आहेत त्याचे पारपत्य करावे याकरिता राजश्री आबाजी इंगले यांजसमागमे फौज दाहा हजार देऊन पाठविले ते खीचीवाडयापावेतो गेले खासा स्वारी बाहेर निघाली येका दो रोजा येथून कूच होऊन स्वारी दरमजल सिपरीचे सुमारे येत आहे सिपरीवरील पलटणे आहेत त्याचे पारपत्य होईल या उपरी नवाब नजबखान यानी मातबर सरंजामानसी कूच करून आंतरवेदीत उतरोन इंग्रेजास तान बसवावा सिपरीचे पलटणचे पारपत्य होताच इकडील फौजा पुढे येऊन आंतरवेदीत नवाबास शामील होतील आतःपर या मसलतीस ढील करणे ठीक नसे म्हणून पत्री आज्ञा त्यास आज्ञेप्रमाणे या पत्राचा त[र्जु]मा पारसी करून आपले पत्र खलिता जाबी आला त्यासुधा नवाब नजबखान यांस दिल्हा व पत्राचा मजकूर समजाऊन येथामतीने उतेजे[न] बाहेर निघावयाविशई दिल्हे व नि[त्या]नी देतच आहोंत त्यास यानी उतर केले कीं म्या या विचाराकरितांच नवाब जाबतेखान यांस कुंजपुऱ्याकडे सिखांसी संमत करावयास पाठविले होतें त्यास मागाहून मिरजा सफीखान जाऊन...... याजकरिता त्या मसलतीस दोने महेने जाले मसलत सिखाची लाबली जर त्यांसी दबून सळूख करावा तरी सलतनतीस ठीक नाही जर न करावा तरी आम्ही तुम्हासी बोलत गेलो व राजश्री पाटील साहेब यांसीही लिहीत गेलो ते गोष्ट आमलात आली पाहिजे या सकटांत आहो म्हणून बोलून आम्हास आज्ञा केली कीं आतःपर सिखाकडील मसलत सत्वरच आटोपून श्रीकृपेकरून लौकरच बाहेर निघतो व पाटीलसाहेबी कौलकरार आणविला आहे त्याचा मसोदा ठेराऊन तुम्हापासी देतो त्याजकडील कौलकरार आला म्हणजे आम्हीही आपला त्याप्रमाणेच करून देतों तोपावेतो पाटीलसाहेबाची स्वारीहीं ग्वालेरीसमीप येते म्हणून बोलून आपल्यास खलिता पत्र दिल्हे आहे ते पाठविले आहे त्यावरून ध्यानारूढ होईल व आम्हासही सागितले कीं तुम्ही आम्हाकडून पाटीलसाहेबाची खातरजमा करून लिहिणे कीं आपली स्वारी समीप आलियास मी सत्वरच आंतरवेदीत उतरतों यांत आतर नाही जे काळजी इंग्रेजाचे पारपत्याची पाटीलसाबास नसेल ते काळजी इंग्रेजाचे पारपत्य करण्याची व श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे व पाटीलसाहेबाचे कल्याणाची मजला आहे आज इंग्रेजाकडील पैगाम मजला आहे कीं पन्नास लक्ष रुपये नगद घेऊन तुम्ही आमचे शामील व्हावे म्हणून मीर खलील याचे विद्यमाने बोलणे आहे परतु हे गोष्ट करणे आम्हास ठीक नाही याजकरितां त्यांजकडील वकील आला होता त्यास तोडीं न लावता बिदा

करून दिल्हा आतां सत्वरच सिखाकडील मसलतीचा समारोप करून पातशाह-सुधा आंतरवेदीत उतरतो चिंता नाही म्हणून बहुता प्रकारे आमची खातरजमा केली परतु दिसत्या प्रकारात हे दिसते कीं आपले फौजेचे हातून सिरोजेस पलटणे गेली आहेत त्याचे पारपत्य होऊन खासा स्वारी पुढे ग्वालेर प्रांती किंवा काळपीचा घाट उतरून आंतरवेदीत आलियास यांजकडील गोष्टी...व लिहीत सर्व प्रत्यास येतील जोपावेतो आपले हातून इंग्रेजाचे पारपत्य जाले नाही तोपावेतो हैदर नायकासारखी स्वतंतर मसलत डोईवर घेऊन येकआंगी वीर होऊन इंग्रेजाचे पारपत्य यांजकडून घडणे दिस[त ना]ही व या दिवसात फुलयंर नामे फिरंगी याचा पलटनानसी कानपुरीहून कूच करून ग्वालेरीकडे इंग्रेज आहेत त्याचे कुमकेस येणार त्यास जोपावेतो हे प[लट]णे त्यास शामील न होत तो-[पा]वेतो जे पलटणे पुढे आहेत त्याचे पार[प]त्य जालियास यांचाही हिरमोड होईल आणि पुढे लढाईही हलकी पडेल याप्रमाणे नवाब नजबखान बोलत होते ते श्रुत व्हावे म्हणून लिहिले आसे आपली स्वारी भेलशास आली म्हणून श्रवणात आले तरी सविस्तर ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे पांच वरसे पूर्ण वनवास करून शुभचिंतन केले पुढें ईश्वर आपली फते करो दर्शनलाभ होय तो सुदीन यांजपासून तुम्ही राहून वचनप्रमाण हाता आले म्हणिजे साहेबापासी येतो येथ-ल्यास श्रेहात गाफील ठेऊन स्वकार्य साधावयाचा समय आहे सविस्तर दरशन-उतर निवेदन करून येक क्षण सेवा धर्मात आंतर करीत नाही याप्रसंगी चाकरी घडोन साहेबाची मर्जी खूश करविणार श्रीसमर्थ आहे कृपा केली पाहिजे हे विनंती

---

ले. ८९ — श. १७०३ माघ शुद्ध १ / इ. १७८२ जानेवारी १४

...जालें मा...याणीही कुल...तपसिलें सरकारांत अर्ज केलें बफजल इलाही दोस्तीच्या अलमात आ मेहरबाची येकदिली व येकसूई कसी आहे याचा बयान नगारश कायें करावा इग्रेजास गोशमाली करून सलतनतीच्या कामास रवनक व जेब द्यावी हे दिलापासून मंजूर तेव्हा मुखालिफाचे तबीची शकल आ मेहरबाकडून जहूरात येईल येविसी शुबःह नाही पुरतेपणे येकीन आहे साल गुदस्ता इग्रेजाची पत्रें पैदम सरकारात आली की लढाई मवकूफ होऊन दोस्ती व येखला [सी*] ची मजबूदी अमलात यावी हेच आमची अर्जू आहे सरकारच्या बेमर्जी कोणती गोष्ट आम्हा-कडोन घडणार नाही त्याचे जाब इकडोन रवाना जाले की सरकारांत तुमची तबीच मजूर आहे सुलह व सलूक तुम्हासी करावयाचा नाही बाद करणेल गाडर बातल इरायाने जमियेतसुधा घाट चढोन आला अखरष मुकाबल्याची ताब आणू न सकता सिकस्त खाऊन फरारी जाला व हजार खराबीने बंदर किनाऱ्याचे

आश्रयास गेला आहे परस्परें दरयाप्त जालेच असेल इंग्रेजास मैदानात येऊन मुकाबला करण्याची नसीहत बरहाबरीच जाली सबब साल मजकुरी फिरोन इंग्रेजानी दोनचार वेळ पत्रे पाठविली जे आमचा इरादा सर्वप्रकारें सुलहसळूकाविशी आहे लढाई दुतर्फा मवकूफ असावी सळुकाचे जाबसालास कोण्ही मातबर पाठऊन देतो त्याचे जाब तुम्हासी सळूक करावयाचा नाही असे साफ इकडून गेले असता इंग्रेजानी उदिष्टिनास श्रीमंत खुदावद न्यामत याचे हजुरात रवाना केलें त्याणी छ २९ मोहरमी पुण्यास येऊन दोनतीन जलशात सरकाराशी व कपणी इंग्रेजासी सळूक व येखलास व्हावा म्हणोन बहूत बजीदी व न्याहात अर्जूने अर्ज केला लेकीन सरकारात पसंद व मंजूर जाला नाही हे कैफियेत येगानगतीचे जागा इतला करा······ष केली असे मुखालिफा···च्या फौजा व सर···सी··· पुढे······वर सरगरम आहे[त बं]गाल्यात फौज गेल्याविना इंग्रेजावर जरब चांगली बसत नाही याकरिता येथून बंगाल्यात फौज रवाना व्हावयाची तर्तूद होत आहे हैदर अलीखां याबकडूनही ताण बराच आहे आशात आं मेह-रबानी कुलापोशाचे गोषमालीवर अजम करून माहादजीराव व तुम्ही येक होऊन मसलत केली असता बहूत दुरुस्त पडेल व खातरखा घडोन येईल काम वखता-वर मवकूफ आहे म्हणोन येक दोन वेळ आ मेहरबानी इशारा केला त्यास इंग्रे-जास गारत कबूवार दीगर अ······हे दुरं······लाई······यापेक्षा आ······ नस्त वखत ध्यानात असलिया दोस्तीचें जागा इतला करावी [उ]मद्या दौल-तीत मोहीम व मसलत हमेश रोबकार असेते लेकीन अवल कोणती मोहीम करावी व कोणती मसलत केलिया तमाम मुफसंदावर दाब बसून दौलतीस रवनक व तरकी होतें हे कुल दर्जे आ मेहरबास रोशन आहेत कलमी करावयाची हाजत नाही इंग्रेजाची गोषमाली सरकारच्या व आ मेहरबाच्या इत्यफाकाने करार वाकई जाली असतां सिख वगैरे बाकी मुफसदाची तंबी चदा मुशकील नाही हा असानी घडोन येईल बाजे मरातब माहाराव पुरुषोतमपंत यास निगारष केले जारश करि-तील हमेशा आपली व हजूरची खैरियेत इतला करोन खुसी ज्यादा करीत असावी म्हणोन नवाब नजबखा बाहदूर यास पारसी पत्रे

१ येथापघत सरकारचे

१ नानाचे

२ येकूण दोन पत्रें

---

ले. ९०
सु. ११८६ रखर २० } श्री नकल { श. १७०७ माघ वद्य ७
इ. १७८६ फेब्रुवारी २०

राजश्री माहादजी सिंदे गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [मो. जा.॥]

श्री माधवराव नारायण प्रधान आसीरवाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये [ लिहीत* ] जाणे विशेष राजश्री देवराव माहादेव हिंगणे याची नेमणूक तुम्हाकडे पेशजी करून दिल्ही बा [ मो. जा.* ] कलमे

[ डावें कोष्टक * ] खासा जातीस रोजमरा दरमाहा रुपये ५०० पाचशे प्रमाणे द्यावयाची नेमणूक कलम १

[ उजवें कोष्टक * ] घरपागेचे स्वार ५० पनास दर राउती शेरा रुो २०० दोनसेप्रमाणे सालीना रुपये १०००० दाहा हजार कलम १

येणेप्रमाणे दोन कलमे दर माहा रोजमरा रुपये पाचशे व पनास स्वाराची नेमणूक सालीना दाहा हजार रुा आहे त्यास हाली मारनिले याचे पुत्र राजश्री दामोदर देवराव याचे नावे रोजमरा व स्वाराची नेमणूक करार करून दिल्ही आसे तरी याजपासून वकालतीची चाकरी घेऊन पेशजीप्रमाणे सदरहू राजमरा दर माहा रुा पाचशे देत जाणे व पंनास स्वारास दर राउती रुा दोनशेप्रमाणे सालीना दाहा हजार रुपये पेशजीप्रमाणे चाकरी घेऊन पावीत जाणे जाणिजे छ २० राखर मुा सीत समानीन मया व आलफ बहूत काये लिहिणे हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ९१<br>रवल २२ | श्रीशंकर | श. १७१३ कार्तिक वद्य ८<br>इ. १७९१ नोव्हेंबर १९ |

पो छ २८ माहे रबिलावल मुा मोहरी मदवार

श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक गंगाधर सिवराम कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता छ २२ रावल मुा लश्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पो विशेष स्वामींनी बहुता दिवसी कृपा करून पत्र कासिदाबरोबर पो ते पाऊन सनाथ जालो श्रीमंत रो आन्यासो व मातुश्रींचे रवानगीकरिता झासीस स्वारी जाहाली म्हणून पत्री आज्ञा त्यास बहूत उतम केले पेशजी रो शंकराजी सुखदेव याजसमागमे माणसे गेली त्याच्या बरोबर आलाहिदा पत्रे सेवेसी पो आहेत ते पाऊन सविस्तर श्रुत जाहालेच असेल त्याप्रो आपण करतील तात्पर्य मारनिलेचे सोबतीने कीपीपन पाठवावे याने घेऊन साकल्य वृत निवेदन केले त्याचीही त्वरा आली जाहादर यांजकडे जावयाची आहे आज उद्या जाणार आहेत स्वामींनी लौकरच आले पो दिवसगत न लागेत ते करावे या समई रो आबाही अले आहेत सर्व गोष्टी घडून येतील तैमूरशाहा पेशोरात दाखल आहे दोन दस्ते मात्र आटक नदी उतरून लटीचे मुलकांत बंदोबस्ता करीत आले आहेत सेवेसी श्रुत होय सदोदीत कृपापत्री सांभाळ करणार धणी समर्थ आहेत बहूत काये लिहिणे कृपा केली पो हे विज्ञापना

बो राजश्री [ मो. जा.* ] आबा स्वामीस कृतानेक सां नमस्कार विनंती येसी जे सदोदीत कृपापत्री सांभाळ केला पो तेणेकरून समाधान होईल वरकड सविस्तर येजमान स्वामीचे पत्री लिा आहे त्यावरून निवेदन होईल बहूत काये लिहिणे कृपा लोभ कीजे हे विनंती

---

लें. ९२ } श्री { श.१७१४ आषाढ शुद्ध ४
जु. ३४ जिल्काद २ } { इ. १७९२ जून २३

नकल पत्र काबुलेहून कोन्हाचे नावे दिलीत आले छ २ जिलकाद सन ३४

मजकूर की शाहंशाह दुररानी खुद बदौलत काबुलांत मुकाम करून आहे जबानी आसदउल...चीचे आणि येक सरदार कोन्ही दुसरा याचे बराबर व जहुदीखान वकील माहाराजे शिंद्या बहादर यांचा हुकम जाहाले होते की पातशाह हिदुस्थानचा खर्चाविना फार हैरान व लाचार आहे माहाराजे मजकूर काही सलूक नाही करतात हे बरे नाही खान मजकूर दर जबाब आरज करून पाठविले की तीस लक्ष रुपये साल खर्चास माहाराजे बहादरनी करार करून दिल्हे आहे माह बमाह पहोचतात आणि अमले फाले हजूरचे मुखत्यार आहे कोन्ही सरदार माहाराजे मजकूरचे मुखत्यार खर्च हजूरचे नाही याजवरून शाहंशाहानी आपले सरदारानसी मसलत केली त्याजवरून सर्वांनी विनंती केली की येक वेळ बंदोबस्त हिदुस्थानचे आगत्य करणे आहे की हिदुस्थानात आईन मुसलमानी राहिले नाही याजवरून तैमूरशाह पातशाह यानी पाचसे स्वार चपर फौज जमा करावयास तैनात केले आहेत इरादा बंदोबस्त [ हिदुस्थानचा ] आहे येक दोन महिन्यात झंडे हिदुस्थाना...होनार आहेत मागून होईल ते लिहून...

---

लें. ९३ } श्री { श. १७१४ माघ शुद्ध १२
[ सु. ११९३ ] जखर १० } { इ. १७९३ जानेवारी २३

राजश्री येशवतराव गंगाधर गोसावी यांसि

दडवत विनंती उपरी सिंदे याचे बोलणे सरकारांत पडले आहे की होलकर बराबरीचे सरदार आम्ही श्रमसाहास करून मुलूक सोडविला त्यापो वाटणी देऊन ज्याजती त्याचे समजोतीकरिता पाच लक्षाची जागा दिल्ही यैसे असोन खावंद त्याची चाकरी मनास आणीत नाहीत हे काय सरंजामाप्रमाणे फौज देखील बाळगीत नाहीत दरोबस्त सरंजामापो दाहा लक्ष रुपये सिलकेस मागे पाडितात येविषयी त्यासि बोलून त्याजला पटाल्याची आथवा काठेवाड कछभूजची मोहीम सागावी हे त्याच्याने न होये तर देसी बोलाऊन घ्यावे आणि त्यानी आमचे मस-

लवीत जाग जागा हिसके फितूर फादर्ढे केले आहेत ते त्याच्या अंगीं लाऊन देतो खावंदानी मनास आणून दोश त्याजकडे किंवा आम्हाकडे हे ध्यानास आणावे म्हणौन त्यावरून श्रीमंताचे समक्ष उभयेता कारभारी यानी आम्हास बोलाऊन नेऊन सदरहूप्रो आज्ञा केली त्याची उतरे प्रसंगास उचीत आणि सुचली ती केली बोलण्याचे भाव बहुत रीतीचे पडलें आहेत त्यातील स्वच्छतेचा व सरळतेचा भाव सिंदे याजकडील द्रिष्टोतपत्तींत आलियावर मग त्यांचा विचार व्हावा ती गोस्ट दिसण्यात येत नाही येखादे कोडे घाळून थकवावे यैसे करू लागल्यास मान्यता कसी होईल प्रस्तुत वाटावाट चालली आहे मागाहून बोलणी होतील तसे लिहिण्यात येईल म्हणौन उतरे प्रत्योतरे जाली याचा मजकूर तपसिले लि॥ तो सर्व समजल्यांत आला यैसियास तुम्ही माहितगारीने उतरे केली ती समर्पकच केली खावंद खावदपणियाने मनास आणू लागलिया फक्त सिंदे यानीच सरकारचाकरी केली आणि आम्ही घरी बसून चाकरी न करितां सरंजाम खाला ही गोस्ट घडली आसे नाही बारा वर्षे हुजूर राहून सांगितली ती चाकरी केली हे ध्यानात ठेऊन सिंदे कोडे घाळून थकवायास पाहातात ते रुचीस न पडता कजिया तुटून मार्गाने सर्व गोस्टी घडल्यात येतील खावंदानी वाजवी ध्यानास न आणितां जसे सिंदे सांगतील तसेच यैकून बोलण्यांत आणिल्यास खावंदगिरीपुढे उपाये नाही वरकड विचार पाहातां सिंदे यानीं हिंदुस्थानात चाकरी केली तसी आम्ही देसी राहून गाडर खासा चाळून आला ते समई लढाई मारली खावंदाचे प्रतापे फते होऊन गाडराने समुद्रकिनारा पाहिला मधी कर्नाटकाची मोहीम जाली तेथेही खावंदाचे वर्चस्वच राहिले आलीकडे हिंदुस्थानात आलियांवर इस्मालवेगाची व मेडत्याची लढाई पडली ते समई कामकाज कोणाचे जाले हे गोस्ट सर्वत्र प्रसिधांत आहे केवल सिंदे यानीच चाकरी केली आणि आम्ही न केली आसा आर्थ नाही आम्ही देसी बारा वर्षे सरकार आज्ञेने राहिलो म्हणौन सिंदे हिंदुस्थानचे वारसदार होऊन बोलणी बालतात त्यापक्षी सरकारातूनच येविषईचा विचार होऊन त्यासी उतरे व्हावी आम्हास देसी राहाविले नसते तर सिंदे वारसदार कशाने होते आणि लढाही कशास पडतां देसी राहाविले म्हणौन इतका प्रकार घडला येविशीचा विचार उभयेता कारभारियानी करावा आम्ही त्यांचे वचनांवर राहिलो व वचनांवर इकडें आलो त्याचे फल हेच की काये सिंदे सरंजामापौ दाहा लक्ष रुपये सिलकेस मागे पाडितात यैसे हाणतात ये विशीचाही मजकूर उभयेतास लोपला नाही इसने समानीनचे साली तीर्थरूप मातुश्री [ मो. जा. * ] बाईसाहेबांसी कारणेकडून वाकडेपणाची चाल पडली त्या प्रसंगेकरून सरंजामाचा आपव्यये आणि सिलिक राहाती किंवा कर्ज होते हे सर्व कागदी पत्री उभयेतास समजाविल्यावरून त्याचेही ध्यानात आहे येविशी पान्हेरा देणे नलगे तत्रापि सिंदे याचे मनात त्यांचा सरंजाम थोडका आणि इकडील सरंजाम

फार जमेचा आसे आहे त्या अर्थी त्यानी आपला सरंजाम देऊन हा घ्यावा यासही नाही म्हणावयाचे नाही सिंदे याचे मते कोडें घाळून थकवावे याजकरितां काठेवाड कछभूज आथवा पटाला दोहीतून येक मखलत सरकारातून सांगावी यैसे म्हणतात त्याचे निराकर्ण दरबारातूनच व्हावे ती गोष्ट न होता त्याचे बोलण्याआन्वये सरकारांतूनही बोलणे पडले त्यास काठेवाड कछभूज हा मुळूक या जिल्ह्यांतील नाही त्यापक्षी तिकडे जाण्याचे कारण नाही पटाला या जिल्ह्यांतील आणि हिंदुस्थान आमची हाडवाई त्यापक्षी येद्यपि पटाऊ प्रांत जोरतलब सिख वगैर यांचा तेथे पोट याजमुळे सिंदे याजपासीं फौजेचा भरणा पुकषळ व दरोबस्त हिंदुस्थानची तहसील त्याजखाली आसे आसोन आजपावेतो त्याचा रीघ त्या प्रांतांत जाला नाही व होत नाही आसे आहे तथापि खावंदाची आज्ञा व आम्हास हिंदुस्थानात विभाग रीतीप्रमाणे घेणे त्याआर्थी कबूल होईल परतु मोहिमीची रीत ज्या मुलकांत मोहिमीस जावे त्या मुलकाआलीकडे जितका मुलूक असेल तितका सोडऊन आपला दखल करून रस्त व पैका यावयास जागा करून मग पुढे जावे म्हणजे रसदेची पुरवणी होऊन व पैका मिळून खावंदाचे प्रतापे मोहीम सर होणे ती होती याप्रमाणे रीत आहे दरम्यान दुसऱ्याचा आमल आणि आपल्यास प्रतिकूल यैसे असतां तो मुळूक पाठीसी घेऊन मोहीम करा म्हटल्यास कसे घडेल याजकरता हिंदुस्थानची वाटणी, पातशाही खालशासुधा दरोबस्त मुलकाची तारंतार द्यावी पातशाहाकडील खर्च लागतो तो निमे वाटणीप्रो आम्हाकडून देवावा निमे सिंदे यानी द्यावा श्रीमंताची मर्जी दरोबस्त सुटलेला मुळूक सरकारात ठेवावा आसी आसालिया तेही मान्ये आहे त्यास व आम्हास न देता सरकारांतून बंदोबस्त करावा या उपरी मुळूक सुटेल तोच येथाविभागे घेऊ हेही न घडे आणि सिंदे कर्ज मान(भाग)वितात त्या यैवजी त्याची फेड होये तोपावेतो मुलकाचा यैवज सिंदे यानी घ्यावा आसी मर्जी आसली तर सिंदे यानी दिलीपो व आफराबियाव व गुलाम कादर याची मालियेत कोट्यावधीची व इस्मालवेग व पाटण मेढ्ते [illegible] लूट मनस्वी घेऊन याखेरीज किरकोळ खंडदंड व मुलकाचे तहसिलीचा [illegible] घेतला याचा विचार सरकारातून मनास आणिल्यास कर्ज मान(भाग)[illegible] तोही आर्थ कसा आहे तो ध्यानास येईल इतके असोन काहीच [illegible] त्याचे कर्जाची फेड होये तोपावेतो मुलकाचे तहसिलेचा यैवज [illegible] मानस आसलिया दरोबस्त मुलकाची वाटणी करून आमचे [illegible] कड द्यावा सरकारातून ठरावात येईल तेथपावेतो [illegible] उपेद्र येईल ते सिंदे याजकडे सरकार आज्ञेने देऊ परंतु [illegible] असावा येणेप्रो आगोधर करण्यात येऊन मग उभयेतांनीं [illegible] आमचे घरचा बंदोबस्त करून देऊन सरकारची [illegible] नेमून द्यावीं म्हणजे पटाल्याची मोहीम कबूल [illegible]

याचे म्हटल्यावर मोहीम करावी आसे म्हणू लागल्यास मान्यता कसी घडेल विचारा मार्गाने कोणतेही सागितल्यास औघड पडावयाचे नाही खावंदाचे प्रतापे सरका चाकरीस कमी न होता घडत गेली पुढेही आंतर पडेल असे नाही मोहीम न हो तर देसी बोलाऊन घ्यावे आमचे कामांत फितूर फांदडे केलेत ते आगी लाऊ देतो खावंदानी मनास आणून दोघ काणाकडे हे समजून घ्यावे आसे सिंदे म्हणता त्यास मोहिमीचा आर्थ मिळून कोर्डे घालावे इत्काच दिसून आला वरकड फितूर फांदडे केले न केले याचा शोध श्रीमंतास नसेल यैसे नाही त्याजकडून जैपू प्रांतात त्याचा दाखला नसोन फौज पाठऊन सर्वोपरी बिघाड केला आसता आमचे आंगी लाऊन देऊ म्हणतात आणि श्रीमंत व कारभारी यैकतात हेच आश्चि आस्तु आम्हांस हिंदुस्थानचा वारसा यावतजीव सोडावयाचा नाही हा कृतनि श्चये तसाच सिंदे याचा मनोदये होळकरानी हिंदुस्थानात नसावे आपणच असावे आसा आहे या गोस्टीस सरकारांतून मनन करून ज्यांचे त्यापरी सांगून वर्तवावे याप्रो घडावे ते न घडता प्रस्तूत सिंदे याची भीड आथवा दबाव काये आसेल तो आसो याजमुळे सरकारची बोलणी सिंदे याचे बोलण्याआन्वये पडतात पडो आम्ही आजपावेतो सरकार आज्ञा उलंघन केली नाही त्याजकडून दगा जाला आसत उतावली करू नये आसी पत्रे येत गेली त्यावरून तीन मास येथेच दम खाऊन चिरंजीव बापूसही इकडे बोलाऊन घेतले आसे असतां आद्याप तेथे जाबसाल येकरुखीच होतात फार चागले आहे सरकार आज्ञा उलंघन न व्हावी आपसात कळह न लावता तुटावा या आर्थी आजपावेतो दम धरला परतु तिकडे प्रथम दिवसच आहे तेव्हां आथःपर घडेल ते केले पाहिजे यास्तव तुम्ही येविशीचे आर्थ उभयेतास दरशऊन प्रसंगास उचीत दिसल्यास हेच पत्र दाखवणे आणि ते उतर करतील ते लेहून पाठवणे पटाल्याचे मोहिमीस पिछाडी निर्बंध आसला पाहिजे याबकरिता दरोबस्त आंतरवेद आमचे स्वाध्धीन करावी म्हणजे पटाल्याची मोहीम आटोपून लाहोरपरियेत जाण्यास येईल रा छ १० जाखर बहूत काये लि। [ नि.※ ] हे विनंती [ नि.※ ] मोर्तब सूद

---

ले. ९४
सु. ११९३ साबान १०

श्री

श. १७१५ चैत्र शुद्ध १२
इ. १७९३ मार्च २३

यादी राजश्री तुकोजी होळकर यासी बोलावयाचा मजकूर सुहुा सलास तिसेन मया व अलफ छ १० साबान

१ पटाल्याची मसलत करून मुलूक सोडऊन सरकारकाम करावें तुम्ही थोर सरदार मातबराने मातबरच काम करावे

१ तुम्ही मातबर सरदार फोज मातबर तेव्हा...मोठीच चाली पाहिजेत हिंदुस्थानात पातशाई मुलकाचा बंदोबस्त फार करून जाला आहे पटाल्याची मसलत

करणे ती तुम्ही करावी ही गोष्ट चांगली ते नाही त्यापक्षी गुजराथ प्रांती अमदाबादेपलीकडे कछभूजपर्यंत मुलूक पुष्कल आहे तो सोडवावा फौज ताजी होईल पोट भरेल सरकारात मुलूक येईल हेही काम मोठेच आहे

१ तुम्हीं हिंदुस्थानात राहिलें असतां तसें काम कांही नाहीं आणि येवढी फौज रिकामी बसणे ठीक नाहीं उपयोग काय त्यापक्षीं देसी यावें मग योजना होणे तसी होईल

१ तुम्ही वं सिंदे दौलती मातबर सरदार... क सवास महशूर आहे अलीकडे दुईमुले वाकडी पडत गेली याचा लौकीक फार जाला आहे येणेकरून सरकारनुकसानी त्यापक्षी दुई मोडून सरकारकाम व्हावे ही गोष्ट सर्वोपरी चांगली

---

ले. ९५ } श्री { श. १७१६ आश्विन शुद्ध १२
सु. ११९५ रवल ११ } { इ. १७९४ ऑक्टोबर ६

गंगाजलनिर्मल अहिल्याबाई होलकर यांसि

श्रो माधवराव नारायण प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले राजश्री तुकोजी होलकर यांची रवानगी देसी कर्ण्याविसी पत्रें येत गेली त्यावरून त्यांची रवानगी केली ते कूच करून थालनेरपर्यंत [गे]ले तेथून पुढे फौजसुधा कासारबारीकडून नवाब निजाम आलीखांन बाहादर यांजकडील मुलकाचे सुमारे जावे असा विचार त्याणी लिहिला त्यास आज्ञा येईल त्याप्रमाणे घडेल वरकड सविस्तर राजश्री देवराव माहादेव यांसी बोलण्यात आले आहे ते लिहितील त्याजवरून कलेल म्हणून लिहिले ते व मारनिलेचे पत्रावरून सविस्तर कलल ऐशास प्रस्तूत नवाबाकडील मुलकास उपद्रव करू नये जमावसुधा येणे लौकर व्हावे नवाबाकडील मीर आलम व रेणूराव घोडाजी येथे जाबसालाकरितां आले आहेत त्याचे बोलण्यात सुरळीत जावसाल व्हावें आसे नाही त्यास तुम्हीं तुकोजी होळकर यांस लिहून नवाबाकडील मुलकास उपद्रव न लागतां त्याचे येणे चांदवडावरून पुण्यास लौकर घडे ते कर्णे जाणिजे छ ११ रौल सुा खमस तिसैन मया व अलफ बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद लेखन सीमा

---

ले. ९६ } श्री { श. १७१६ आश्विन शुद्ध १३
रवल १२ } { इ. १७९४ ऑक्टोबर ७

गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांसि

श्रो बालाजी जनार्दन आसीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लिहीत आ[सिले] पाहिजे विशेष आपण पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले राजश्री तुकोजी होलकर सुभेदार यांची रवानगी देसी कर्ण्याविसी पत्रे येत

गेली त्यावरून त्याची रवानगी केली ते कूच करून थालनेरपर्यंत गेले तेथून पुढे फौजसुधा काशरबारीकडून नवाब निजामआलीखान बाहदूर यांजकडील मुलकाचे सुमारे जावे आसा विचार त्याणी लिहिला त्यास तेथून लिहिले येईल त्याप्रमाणे घडेल वरकड सविस्तर राजश्री देवराव महादेव यांसी बोलण्यात आलें आहे ते लिहितील त्यावरून कळेल म्हणौन लिहिले ते व मारनिलेचे पत्रावरून सविस्तर कळले अैसियास प्रस्तूत नवाबाकडील मुलकास उपद्रव करूं नये जमावसुधा येणे लौकर व्हावे नवाबाकडील मीरआलम व रेणूराव घोडाजी येथे जाबसालाकरितां आले आहेत त्याच्या बोलण्यात सुरळीत जाबसाल व्हावे आसे नाही त्यास अपण सुभेदार यांस लेहून नवाबाकडील मुलकास उपद्रव न लागतां त्याचे येणे चांदवडावरून पुण्यास लौकर घडे ते करावे रो छ १२ रोंवल बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ९७<br>श्रावण शुद्ध ९ | श्रीगणराज | श. १७१७ श्रावण शुद्ध ९<br>इ. १७९५ जुलै २५ |

विज्ञापना यैसी जे मशीरची फौज शेवगांव पावेतो दाहा हजार आली श्रीमंत राजश्री [मो. जा.*] नानाकडील वस्तभाव फराशखानेसुद्धा पागा पीलखाना गौशाळा आदीकरून सरकारांतून व सिंद्याकडून निक्षूण ताकिदी होऊन सुतळीचा तोडा-वस्तवानी वाड्यात दाखल व्हावी व कांहीं जाली व कांहीं होणार मुख्य अनुष्टान बळोत्तर श्रीमंताचे राज्याचे ठिकाणी येकनिष्टता याजकरिता अैसें आमलात दिवस आले पुढेही तद् उतम सलाहच होईल बोलवा दाट सांप्रत आहे कीं सिंद्याकडील बायांचा मुदा बाकीस की बाळोबास आणावे म्हणजे सर्व बंदोबस्त होईल भानगड बहूत होत आहे हाली रामजी पाटील व रायाजी पाटील पुण्यात व रावसाहेबाकडे बोलण्यांत आहेत पाहावे काहीयेक उतम जन्म बसलियाची चांगले श्रीमंताकडील कायेम मिजाजीचा आर्थ तों साहेबजादे आहेत दक्षणेचा प्रकार दोन तीन च्यार पराकाष्टा आधेली व सरकारवाडियात सालाबादचे यादींचे नेमणुकीत चतुर्थास सर्वांस येणेप्रो देकार जाला चिमणभटजीस चतुर्थांस रुपे पांच दक्षणा आली यैसीच सर्वां प्रतीष्ट ब्राह्मणाची गती जाली कोण कोणी आश्रित वगैर याची पांच हजार तीन हजार पांचसे दोनसे यैसे [ति ? वी] स हजार दिल्हे रमण्यात मिश्रजीचे सिपारसी पाणके वगैर याची पंनास पंचवीस लालजी पाणक्यास आठरा येणेप्रो आव्यवस्त लोक निषेध बोलतात सरकारात यैवजाची बहूत आडचण तथापि हाली राज्यक्रांति परंतु बक्षी व पठाण फौजेची तयारी करून पर्वतीचे येकबाजूस बंदोबस्तास राहिले होते तात्पर्य की कोणास बायेकामुले प्रदक्षणेचे लोकांस वगैर कोणास उपसर्ग काडीमात्र जाला नाही हे येश उतम घेतले नानाचे लस्करात फौज ठेवणुकीची मंदी पडली होलकराची तो आगदी ताळच नाही पैशजी

गांवचे कमावीसदार समंधी व मसोद्याचे उतर यैसे पत्रे पावलियाचे उतर सत्वर पाठवावी रा श्रावण शुध्य ९ सोमवार च्यार घटका दिवस बहूत काय लिहिणे हे विज्ञापना आलीकडे पांच साहा पत्राचे उतर आले नाही यास्तव पावली किंवा गैर विल्हेस राहिली याजकरिता उतर लिहून पाठवीत जावें आधिकोतर कलल्यावर लिहू हे विज्ञापना

---

| | | |
|---|---|---|
| ले. ९८<br>सफर ३० ( २९ ! ) | श्री | श. १७१७ भाद्रपद शुद्ध १<br>इ. १७९५ सप्टेंबर १४ |

विज्ञापना मसीर मुळूक दाहा हजार फौजेनसी बीडास दाखल जाले मागाहून आणखी दाहापंधरा हजार येणार बीडच्या फौजेचे समागमे रा माहादेवभट शारंगपाणी मुख्यत्वे आहे रा भोसल्याकडील फौजेत रा बाबूराव वैद्याचे चिरंजीव वकालतीस आहेत तीही फौज येणार म्हणून बोलवा आहे रा भिकंभट व दादा वगैर व बलवंत बाबूराव व बाळाजीपंत करमरकर यैसे लोहगडास आहेत छ ३० सफर सोमवारी चिमणभट मठकर यांचे तट्टू माघारे गांवास गेले त्याबसमागमे रा दाजीबा देशपांडे जानोरकर यांजबराबर लाखोटे दोन लहान १ व थोर १ येकून दोन पैकी मसोद्याचे उतरसहीत पा ते पावलीच आसतील पत्रोतरी वरचेवर कलत आसल्यास उतम आहे हाली च्यार पत्रे पाठविली त्याचे पावलियाचे उतर आले नाही म्हणून चिंता वाटते उतर जलद येत जावें आधिकोतर वरचेवर लिहू खर्चाविशीचा मार पत्री जमेस लिहितात उतरी लक्ष राहिल्यात येत नाही तर यैसे नसावें नानाकडे आंबारीचे हाती नानाचे लस्करात नेले होते ते पंचमीचे दिवसी नजर केले बाकी पागा वगैरे जेथे जेथे सरंजाम वस्तभाव आसेल ती सरकारातून ताकीद आहे की येका ठिकाणी करून नानाकडे प्रविष्ट करावा यैसे आहे हे विज्ञापना

---

| | | |
|---|---|---|
| ले. ९९<br>सु. १२०४ रजब १ | श्रीम्हालसाकांत | श. १७२५ कार्तिक शुद्ध ३<br>इ. १८०३ आक्टोबर १८ |

राजश्री आचेत्रीतसिंग गोसावी यांसी

दं अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] श्रो येशवंतराव होलकर राम राम सुा आर्बा मयातैन व अलफ तुम्ही सिनरास जाऊन राजश्री नवाब शामतखान यांचे आमलदारासी खटखट करून चांदवडास गेला तेथून श्रीमंत राजश्री [ मो. जा.* ] रावसाहेबाकडील गांव सुखेड वगैरे येथे उपद्रव देऊन मनस्वी बोलणी बोलता म्हणौन विदीत जाले अैसियासी आपसात कलहेकरून लोकास तमासा दाखवावा श्रीमंताकडील गांवखेड्यास उपसर्ग देऊन मनस्वी आपले ठिकाणी बोलावे त्याचे बोभाट येथवर यावे हे चांगले नाही यास्तव हे पत्र

सादर केले असे तरी तुम्ही याउपरी आपसात खटखट न करतां श्रीमंताकडील गांवखेड्यास उपद्रव न देता त्यांची मर्यादा राखून ज्यांत त्यांजकडील बोभाट पुन्हा न ये ते करणे [ नि.* ] जाणिजे छ १ रजब [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ वा* ] ॥ श्री ॥ । मोर्तब । सुद

[ पाठीवर वा. शि. * ] ० ॥ श्री ॥ ० । म्हाळसाकांत । चरणी तत्पर मल्हा । रजीसुत खंडेरा । व होळकर

---

ले. १००
सफर २३ } श्री {

विज्ञाप्ति ऐसी जे नजीबखान छ २३ सफर पावतो शुज्यातदौलाचे हवेलीत आहे अजारी बहूत सर्वांग सुज[ ले ] अहे छ २२ तारखेस रात्री हातपाये आपटीत होता इंद्रियाचेवाटे रक्त व पूं वाहातो वैद्य रात्रंदिवस इलाज करितात लोकाचा मुजरा पलंगावर पड्ल्या पडल्या पड्यांत होतो अलमखा नामे पाचाशा स्वारनसी चाकर होतात तो बरतरफ केला तो येमुनापार गेला व आणीकही लोक बरतरफ होत जातात क्षणांत नजीबखानाची खबर की मेला क्षणात की पड्यांत आहे येशा गोष्टी दिलींत होतात दुसरे नजीबखानाची खबर आहे की नजीबाबादेस जातो याप्रो तिकडील वृत आहे जवाहिरसिगाची पत्रे दोस्तीची नजीबखानापासी जातात जवाहिरसिंगाने नजीबखानास लिहिले की सिखाची फौज बोलाविली व तुम्हीही येणे सर्व येकत्र होऊ दुसरे जवाहिरसिगाने नागरमल व रामकृष्ण महंत या उभयेतास नजीबखानाकडे पाठवावयाचा करार केला आहे की पातशाहा दुसरा करावा सर्व बंदोबस्त पातशाहीचा करावा नजीबखानाने लिहिले की च्यार रोज ढील न करणे जवाहिरसिंगाची पत्रे याच गोष्टीसाठी नित्य नजीबखानास जातात नजीबखानास शुजातदौलाचीही पत्रे याच मजकूरची येतात दुसरे स्वामीनी नजीबखानास पत्रे मुरलीधर मिश्रर याचे मार्फतीने पाठविली त्याने गुजराणिली मग नजीबखान बोलला की या हलके माणसाबराबर पत्रे पाठवणे सलाह नाही तो दिलींत जागा जागा पत्राचा मजकूर दाखवितो [या] प्रो वर्तमान दिलीतून आले ते खाली लिहिले असे ही विनंती

---

ले. १०१
पौ रवल ३ } पो छ ३ रावल {

या लिहून पाठऊ कालचे दिवशीं लडाई...घरच्या लोकानी चांगलाच केला कसा म्हणाल तर मऊच्या मुकामीहून नरणावियाचे रोखे आमचा कूच जाला हे वर्तमान दुश्मनास कललियावर त्याणेही फौज चांगली सजोन तीन टोल्या सासाच्या

राउताच्या केल्या पुढें पाईची माणसें व जजाला करून शेखपुराच्या अलीकडे कोस सवा कोसावर येऊन जागजागा थटकोन तुंग फौजेचे उभे राहिले होते आमचे स्वारीचे हरावल रा। बाबूराऊ गोपाल यांचा तुंग व व डावे बाजूस इंद्रमणजीचा जमाव उजवे बाजूस रा। देवाजी त्रिमल च्यारपांचसें हिंदुस्थानी स्वारानसीं निशाणाचे हातीच्या मागें खासा पागा तिन्ही व चिरंजीव तात्यासाहेब......आमचा हाती या......लोकानसी स्वारी...[न]दी उतरोन आमचा......त आमच्या लोकानी त्याच्या......पाहोन जागजागा खबरदार जाले त्या गु......हरावलीच्या लोकांस दबाऊन चांगलेच रेटिले त्यास हे हिंदुस्थानी लोक यांचा पाय डगमगला म्हणजे थांबणें मुस्कील ईश्वरच ते समई त्या लोकांस हिमत देऊन त्यांचे हातून काम बजावील तर बजावो नाहीतर मानवीच कृत्य नाही असें त्या गुलामाचे फौजेचा जोर पाहून हरावलीचे लोक सरकोन गेलें दाहा बारा राउतानसी रा। बाबूराऊ गोपाल उभे राहिले डावे बाजूकडील इंद्रमणजी सरकले उजवे बाजूचे लोक तेही निघाले देवाजीपंत व भिमाजी बाबूराऊ व जसोंदीसिंग त्रिवर्ग मात्र उभे ......बेहिमत होऊन......खाले उतरोन घोडी......साहेबाच्याने धीर धरवला......पागानसी व दिलीचे दाहा बारा मोगली......जामानसीं उठोन दुशमनासीच जाऊन गांठ घातली वडिलाचे पुण्य विशेष त्या प्रतापाच्या तेजाखालें ठैरलेसें काय होतें मोहरा फौजेचा फिरविला तो पुढें मागें आमचे पागेचे लोक लागले हे हिंदुस्थानी फौजेने पाहून तेही फिरली मारीत मारीत दोन कोस लोक आले त्याजला देखील वाटभूल जाली ज्या ज्यांस जिकडे वाट फुटली तो तिकडे गेला पांचा साता राउतानसी बरणावियाचा मार्ग सोडून आणख्याच मार्गेकरून गडांत गेला अद्यापिवरही दोन च्यारसें माणूस व तीनच्यारसे स्वार समीप आहेत पुणरोक्तही जुंझाचाच इ[रादा] ठेवितो पाहावें का......पाठऊं श्रीकृपा ......व श्रीवडिलांचे असी......चिंता न करणे हे विनंती

---

ले. १०२ } श्री नकल {
रुमाल ११ }

राजश्री केदारजी सिंदे व माहादजी सिंदे गोसावी यांसि

ई सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [मो. जा. *] श्री रघुनाथ बाजीराव असीर्वेद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष मोधोसिंग मामलत सुरलीत चुकवीत नाही बिघाडावरी आले आहेत त्यासी व तुम्हासी लडाई होणार म्हणून बातमी आली ऐशास प्रस्तूत ते प्रांते राजे रजवाडे जमीदार सर्व बदमामलीवरी आहेत येकानी बल धरिले म्हणजे त्याचे पुस्तगर्मीस चुकावयाचे नाहीत इकडील फौजा म्हणावयास तुम्हीच आहा

याजकरिता केवल बिघाडावरी घालून लढाईस प्रवर्तावें हे गोष्ट मनसभ्यास युक्त [दिसत ना]ही इकडून कुमकेस पा...प्रहकृत्याचा प्र...ला आहे तो तुम्ही...च असेल... फौज र...भरतीने...ज्यास्त जाली...इकडील बंदोबस्त...ते प्रांते आलियावरी जर बा...[का]र्यास येईल तूर्त सलाबती...रून आपले तालुकियाचा बदो[बस्त] उतम प्रकारे राखा हे मनसभ्यास युक्त आहे तरी बिघाडावरी घालून जुंजाचा प्रकार येकंदर न करणे तुम्ही तो तेथील प्रकार पाहून काबू साधाल हे खातरजमाच आहे इकडे मानाजी शिंदे यास सरदारीची वस्त्रे दिल्हीं याजकरिता तुमचे चितात विशमता बैऊन येक दोन पत्रे पाठविली तरी येविसीची विशमता तुम्ही मानावी ऐसा अर्थ नाही पुढे तुम्ही हुजूर आलियानंतर सर्व गोष्टी उतमच होऊन येतील मुख्ये गोष्ट सरकारसेवा येक निष्टेने करावी यांत कल्याण तेच घडून येते जाणिजे छ ११ रावल बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. १०३ } श्री {
रवल २५ } पैवस्ती छ १ रालाखर {

श्रियासह चिरजीव [मो. जा.*] राजश्री राजेराव दामोदार माहादेव यांसि प्रति माहराजे बापूजी माहादेव कृतानेक आसीरवाद उपरी येथील कुशल ता छ २५ माहे रबिलावल मुकाम इद्रप्रथ जाणू स्वकीये कुशल लिहिणे विशेष तुम्ही चिरजीव नानास पत्र फैज दूर करावयासी लिहिले आसता ते त्याणी न केले आणि जैत्याचे गळीस लागले इतका तर विचार करावयाचा होता जे नजीबखान त्याची जड त्याचा काबू याप्रकारचा जे पनासा लाखाचा मुल्ख[क*] काढून जाटास दिल्हा वजिराने शक मारून दिल्हा त्यास या प्रकार( र )चे नाच्यार होऊन करावे आणि लोखो रुपयाच्या सिबंदी खाले पाये घोडाजी नाइकाच्या हुड्या आल्या त्यासाठी आपली वस्तभाव ठेवावी त्यास वस्तभाव आगर व घरदार येवडीच मनुशाची आबरू त्यास जतन कोणे प्रकारे करावे हे चिरजीवास कलत नाही येक आवलियाचे काम केले तेव्हाड्यावर मथू म्हणून सिबदीचे खेकटे हाळू हाळू वारून ज्यात आपल्यास लाभ होये सावकारास जजाल न होये या वाटेने चालावयाचे होते ते न करता जैत्याचे गळीस [लागले] त्यास ते वाटेने काम करिता जाणत नाहीत...या उपरी तरी आपण मीरटेस येऊन जैत्यास बोलाऊन पाच पचवीस रुये ठरतील ते मामलत करावी आणि सिबदीची खेकटे वारावी सरफास सकट न होये रुपया पोहचे ते करणे आपली पत राहाते व सरफाची पथ(त) राहे ते करणे वजिरास म्हणावे जे तुम्ही नबाबतखान याचे लेकाची मामलत देखील नजीबखानाने होऊ न दिहे पनासासाठी लाख रुपायाचा मुलूक जाटास देविला तुमची सलतनत तमाम नगदियात माहाकूफ जागीरदार तो राहिले नाही जे थोडे बहूत भले मानूस राहिले त्यापासून

आरधी पेशेकेस घेतली कट फैजबद [ होती ] ते बुडाली राहिला येक तुमचा साहीर तोफखाना त्यासही तीन तीन फाके त्यास बाहेर निघालिया असा बंदो[ब*]स्त कराल की काये बरे घरी बसल्या आसता बाहेर निघोन न कले वजीर काये करितील हा भ्रम होता तोही गेला [हा*]ही जातो आताही साभालाल तर या गोष्टीचा निश्चये करावा जे जैत्यास काढून द्यावे नजीबखान [ आ ] ला तर साहारणपूर तगीर करावी आणि नजीबखानाचे मुलुकाचा आणि निजाबतखानाचे मुलकाचा अम्हापासून इजारा करून घ्यावा हें जालियावरी अणीख विनंती करूं तुम्ही रुख पत्र जैत्याचे तालोकियावारी द्यावा आम्हावरी न करून निजाबत-खानाची त···व त्याजला···सदार करून सिरसिंदीचा इजारा कराल ती इजारा करून देऊ तुम्ही याच जिल्यांत सैर करून···व दुरुस्त करावें यैसें अम्हास वाटतें बरें असेल तरी करावें नाही तरी यादिया...ता येक नजीबखानाचे हाते करितां लोकाच्या दावलता सोडल्या तेव्हा तुमचे स्वार स्वाऱ्यांस वजीर सादुलाखां याणी जर देखील म्हणार नाहीं तेव्हां अहमदखा शुजाउदौला वगैरे काय म्हणतील व कोण लिगाट होईल दुनिया भीक मागते तुमचे उदरा......बकसी वगैरे चण्दावरी खैरातीवर पोट भरितात तुमचा हा अहवाल अतांही तजविजीने अपले घरास न राखाल तेव्हा कधीं राखाल बिलफेल नजीबखानाची बात केली उतम केले अतां जैत्यावरी चालल्यास अमची पाच च्यार इजार फौज त्या...ची बंदगी करायास सिध होईल निजाबतखांही जाईल क्रोडी रुपयाचा मुलक सिरहंद पावेतो सुटेल मग तुम्हास लाहोरास चाल...णें लाहोरास चला अथवा जाटाकडील आपल्या जागिरा पातशाचा खालसा सोडवा न कराल तरी अम्हांस काय तरी आमचे तरफेनें अणिखाच्या, खेडी आसे म्हणून जैत्याखी बोलाऊं तकसीर माफ करून अमचाच अहेस हे म्हणलिया प्रा बोलोन जर वजीर चालत असिला तरी हे काम करून घेऊन मग निजाबतखानास घेऊन मग नजीबखानास छेडावें तोपावेतों गाफील असावे जैत्याची पाठ राखील तरी सायार जवार इजारियाचें अमचे हवाला करावें याप्रा बोलून जेव्हा वजीर या पल्यावरी येईल तेव्हा छेडावें साप्रत मसहलत असेल ते करावी येथे जामदारखानियासी चिटी तुमची अली जे जवाहीर धोंडाजी नायकाचे हवाला करणे त्यासी ते...पुसायासी त्याचे गुमास्ते अले म्या म्हटले उतम परंतु हा जवाहीरचा मुकदमा आहे...येकांती बसून जेठमलास बोलावून...करीन तुम्हाजवळी असिले तरी काय आणि जामदारखानियांत असिले तरी काय चिंता जामदारास सागितलेंविना पुसल्याखेरीज व चिरंजीवाचे लिहिल्याखेरीज तरी देणे नाहीं त्याणी म्हटल्या दिधले म्हणून रागास अलों म्हणून त्यास कदाचित विषम वाटेल तरी म्हणावे जे राजे साहुकारासी मित्रत्व याकरितां करितात जे साहुकार राजे लोकांची पत राखितात राजे लोक साहुकारांची राखितात त्यासी तुम्ही जवाहीर दिधलें तेव्हा लौकिक हा जाहाला जे हे अपली आभूषणेंही गाहाण

ठीऊ लागले तेव्हा अमचे पतीस डाग लागला अमचे पतीस डाग लागला तेव्हां सहजच तुमचे पतीस लागला त्यासी पतीस डाग लागला मग जीवितव्य काय त्यासी तुमचा कोण्ही विश्वास करणार नसेल तरी श्री...पैकी... न आजीपर्ये[त] अमचा विश्वास इत्का अहे जे सलाबतजंगा दक्षणची पेशकस सलाबतजंगाने कबूल के[ली] तितकी अम्हीही कबूल करू जितके रुपये त्याचे अले होते तितक्यांतून लाख रुपयाची टीप, अम्ही वचनावरी उडऊऊन देविली मीर बकसीगिरीवरी सा लाख रुपये येक अपनाकडून भरविले सा लाख कोलेचे दिधले...मता बाबद अडीच लाख दिधले जामदारखानियातून येक कवडी न [ घेता ] अपूण पाठविले नाही तरी ठविलेही नाहीं याप्रो बोलल्याचे...स कोण्ही लिहून अजुर्दा करतील तीस बाधा न करणे त्याची.....त कसी नाहीं अपली मांडी उघडतां अपल्यास लाज जे दिवसी औलियाखानाचा फैसला जा[ला] तेच दिवसीं सिबंदी दूर करायाची फिकीर करायाची होती ते केली असती तरी अजी ज.....ठीब कशास म्हणावें लागतें आतां तऱ्ही जवाहीर राहे ते करावें बहूत काय लिहिणे हे असीर्वाद

---

ले. १०४ } श्री {
रवल २८ }

श्रीमंत राजश्री [ मो. जा. * ] नानासाहेब साहेबाचे शेवेसी

अज्ञाधारक लाला बाल गोविंद दडवत विनंती उपरी येथील कुशल ता छ २८ रोविल मुा फरुकाबाद श्रीगंगातीर साहेबाचे कृपेकरून येथास्थीत असे विशेष. बहूत दिवस जाले आपल्याकडील वर्तमान कलत नवते साप्रत [ कृपा प ]त्र साहेबाचे मथुरेच्या चौब्याबराबर आले वाचून बहूत अनंद जाला यैसे निरतर पत्री अनंदवीत जावे आमचे वर्तमान तरी आपण इकडून गेलियावर आम्ही दोन वर्षे सुरजमलापासी राहिलो तेथे कोणे गोष्टीचा बनाव न बने म्हणोन शुजाउदौले याजकड गेलो लाख दोन लाख रुये आपले परावे काहाडून सरकारांत दिल्हे येक वर्ष होतो तेथे अनूपगीर गोसावी याने खोटेपण करून आम्हास लुट [ न ] घेतले व मारावयाच्या इलाजात होता परंतु सुजाउदौलानी उपराला काही न केला पैका······बुडाला सर्व गेले मोठी अफत जाली तेव्हा [ तेथू ] न निघोन हाफीज रहमतखानापासी अलो···[ तेथे ]ही वर्षे दीड वर्ष येक हजार रुये दरमाहा देत·····गुजराणी चालत होती तेही त्यानी मना······फरुकाबादेस आलो येथे······ आम्हामधे काही ताल राहिला...रा मल्हारजी होलकर उलटे आम्हासी कजिया [ करा ]याचे उद्योगात होते दुसरे श्रीमंत रा दा[दासा]बासही येकदोन पत्रे पाठविली त्यानीही वरचेवर...की बाद बरसात येणे त्यास आम्हापासी ख[र्चा]ची तंगी याजमुळे बरोबर फिरावयाचा सरजा[म पा]-

हिजे तो नाही येसे सर्वा गोष्टीने अडच[ण]च आहे आता या समयात येक ईश्वर वाली किंवा आपण आहेत येसा कोण्ही नाही की आग्हास उठऊन उभे करी कामकाज घेऊन उर्जीत करी अमचे लोकाकडेल दणे बहुतच आहे ते कोठवर ल्याहावे येशास जैसी सलाह आपण लिहितील त्याप्रो वर्तू येक पत्र श्रीमंत रा दादासाहेबास अम्हाविशीं उतम प्रकारे लिहावे की ते अमची सर्व गोष्टीची खातरजमा करीत आथवा आपलेपासीच बोलावयाचे [अन]कूल असेल तर उतमच आहे तेथेच आ...सी येऊन हजर होऊ जैसी मर्जी असेल त्याप्रो वर्तू आता येथूनही श्रीमथुरेस जाऊन तीर्थवास करावा हा हेत आहे आमचे तीर्थरूप श्रीवृंदावनात आहे तेथेच जाऊ श्रुत होये आमचा गुमास्ता किशनचंद होता तो मृत्य पावला त्याचा पुत्र आमचा पैका घेऊन पलोन रोहिल्याच्या मुलकांत जाऊन बसला आहे येसी बदमामली त्याने केली सर्व गोष्टी साहेबास लिहिल्या आहेत जैसी दस्तगीरी होईल तैसी करणार आप[ण] समर्थ आहेत आमचे सर्व वर्तमान श्री[मं]त राजश्री पुरुषोतमपंत नाना यानी [आ]पल्यास सर्व लिहिले आहे हेही कार्या... येथे आले यानीही आमचा परामृ[श] करावयाचा तो केला सो श्रुत हो [ये] पत्राचे उतर बालबद आथवा पार[सी लिहून पाठ]वावे मोडचे अक्षर वाचा...हे विज्ञाप्ती

---

ले. १०५ } पौ छ १० माहे रबिलाखर {
रवल २८ नंतर }

उपर रा गोविदपत बुंधेले याचे लस्कर येक महिना मौजे तिरवा वगैरे गाव तेथ मुकाम होता ते वेळेस गाव बहबरा लूटून नेले व रबी कापून नेली त्याजपासी रा मल्हारपत व मानसिग पाठविले होते परतु त्यानी रबी कापून नेली हाली छ २८ रावल मु॥ गुलवडी प्रा॥ तालगाऊ तेथ घाला आहे त्यास आपले दडवतीचे गाव नजीक आहेत तेथील रबी कापून नेतात आपला ब्राह्मन रा महिपतराऊ त्याजपासी गेला होता की कनोज परगणियाचे गाव काये निमित्य खराब करिता त्यास त्याच्या लस्करात रा घोंडाजीपत व मीरखान टोकरा आहे तो काही त्याचे मानीत नाही इकडील गाव खराब जाले तैसेच दडवतीचे गावही खराब जाले पाचा साता हजाराचे नुकसान जाले तुम्ही श्रीमत उभयेतास वर्तमान सांगितले पाहिजे आपला इलाज या गोस्टीस काये करावा आताही कितेक दिवस राहतील हे न कले आपले सेवसी निवेदन जाले पाहिजे आपण रूबरूही त्याजला सांगावयासि चुकलो नाहीत परतु ते मानीत नाही येक ब्राह्मन व च्यार मानस लस्करात ठेविली आहेत असे वर्तमान आहे बहुत काये लिा हे विनंती

---

ले. १०६
पौ रखर ३ } पौ ३ राखर {

...तेक जाणार आनायासे संगत सेट्याजी खराडे येऊन प्राप्ति जाली त्यांजबराबर हे वरकड लोक जायासी सिध जाले त्याजमुळें इकडल्यांचा वसवास मार्गी न राहिला व आपल्यांकडील वसवास म्हणावा तर सरदार आपल्याकडील मागती भला राऊत व भलें घोडें लाचार नाही त्यांही दोनी दिवस राज्यांचा व त्याचा पूर्वील श्नेहभाव भेटीस्तव मुकाम केला आनायासें समागमही उतम मिलाला साजसामान जो लागला तोही पालखी वगैरे करून दिधला उंटे बारबरदारीस्तव जरूर जाली तीही करून दिधली तिची यादी मागून पाऊन राहील साजसामान राहिला होता श्रीमंत [मो. जा.*] दादाबाबत तोही येका उंटावर घाळून पाठविला मनोहरपुराकडील मार्ग दुस्तर वस्ती कोठे न राहिली कुल राण विसालें इकडें निभाव न पाहिला याजकरितां रांगड्यांचा अविस्वास जाणून घरची सोबत सुरक्षित विजये लस्करासी पावतील तेथून पुढें गाजुदीखानाचे लस्करावरून नीट दिलीस जातील हेच सलाह नेक जाणून सेट्याजीना आजी भोजनोतर माध्यानी रविवारीं मार्गस्त जालीं इतके दिवस सीतज्वरेंकडून बहूत पीडीत होती आता बहूत उतार होऊन स्वस्थ आहेत सेट्याजीचा वेत राज्यांकडून हाथी संपादायाचा यास्तव रदबदलही लागून राहिली होती बहुधा राज्यांही मान्ये केलें व सामादिकांचीही मर्जी किमर्थ कीं पूर्वी बगरूचे वेलेस यानी बहूत श्रम केले याजकरितां हाथी अथवा हाथीण देतील हरी गोविंदजीनी घरींच त्याची मेजमानी केली वस्त्रें पांच दिधली राज्यांकडून पांच शेत रुपये व चारी वस्त्रें व येक रकम जवाहीर द्यायाची तजवीज हथीसिवाये जाली होती डेरे दांडे मार्गस्त करून सडे राज्याचे भेटीस्तव व रुकसतेकारणे येऊन समये तिष्टित राव केशोदासजी याचेथे बसले होते जे काहीं अमलांत येईल ते विनंती केली जाईल आजी तर त्यांचा सर्वांचा मुकाम वसईसमीप जाला उदैक पुढें मजल करितील विदीत होये राजश्री सेट्याजीसी मीही भेटलों पहिल येथील मामिलतीत हेच वा निकार होते आतांही यांसी बहूत काहीं भाशणे जाली यानीही असाच मनसुबा रचिला आहे की श्रीमंताजवल पाऊन मागती स्वामीसहवर्तमान परतून येखादा मनसुब्यानसार येथें येऊन दिवानजीस अथवा हरयेका मातबरासी घेऊन जाऊन जाट व बिजेसिंग वगैरे यांजकडील व रामसिंगाकडील मनसुबा उचलावा असा विचार केला आहे यास्तव व दुसरें ग्रहस्त मंडलीतून कोणीही अजवरी वर्तला नाही व दिवानजी नित्यानी हिसेब करा म्हणून मुतसद्यासी ताकीद करितात परंतु हिसेब होतां दिसत नाही न कले तिनी लक्षाचा मुदा कसा काये म्हणून नानाप्रकारें संदेह उत्पन्न होतील व श्रीमंत [मो. जा.*] दादासो व माझी भेटी जाली नाही प्रसंग अणखीच जाला खाली मैदान जाणून हर येकानी घोडें घाळून कुल

मामिला डऱ्हला वर्तमान तरी सर्व कलावें व दुसरें मातुश्री सो ताई याजब्राही तेथवर कोणी असावा असा कितेक प्रसंग जाणून रो दे...

---

ले. १०७ } श्री {
रखर ७

राजश्री दामोदर माहादेव गोसांवी यांसि

दं अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य [मो. जा.*] श्री मलारजी होलकर दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविलें ते पाऊन वर्तमान कळू आलें मार्ग फुटत नाही याज-करितां यावयाचे बनत नाही तर त्या मार्गे मथरेसीं जाणें तिकडून सत्वर लस्क-रास येणे त्या मार्गे वाट चालत आहे [नि*] छ ७ राखर [नि*] बहूत काये लिहिणे हे विनंती [ब.*] मोर्त । व सुद [पाठीवर हिद १।२१ प्रो शि*]

---

ले. १०८ } श्री {
रखर ९

पुा राजश्री पुरुषोतम माहादेव गोसिं

उपरी सरकारांत ऐवजाची वोढ पडली आहे तर्तूदही केली असे परंतु या वोढ्याचे दिवसात येऊन पोहचणार नाहीं त्यास अहंमदखान पठाण याचा श्रेह-जाला आहे त्याणी दोन लाख रुये द्यावे तूर्त म्हणजे त्यांचे श्रेहाची निशा होईल व ऐवज प्रस्तूत उपयोगी पडेल विशेष कांही त्यांणी अनमान कराव असें लिहिले नाही याची पैरवी करून ऐवज घेऊन पाठवणे जाणिजे छ ९ राखर बहूत काये लिहिणे [वा.*] लेखना । वधिः

---

ले. १०९ } श्रीलक्ष्मीनरसिंह {
रखर २५ } पो छ १२ जावल {

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवसीं

सेवक यादवराऊ प्रल्हाद सां नमस्कार विनंती उपर येथील क्षेम ता छ २५ माहे राखर मुा पा सिंगो...जाणून स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष कृपापत्र राना छ १५ रावल छ १० राखरी पाऊन मस्तकीं वंदून सनाथ जालो शुज्यावदौलाकडे गेलो होतो त्यास कितीक गोष्टी समजाऊन सागायाचा विस्तार दोन बंदात स्वदस्तुरें लिहिला व तेथील दरबारचे काम त्रिंबकरावाचे नावाचे मुकरर होये व येखितयार आपनाकडे देत व कांही दरबारखर्च सरंजाम सरदारांची बाकीपैकी व इलाहबादचा खर्च पहिला राहिला आहे तो देणे तर

वजीर व पातशाही दरबार व सरदारांकडीलही सर्व बंदोबस्त राखून ज्यांत काम दोही सुबयाचे हाती राहे व पुढे त्याचे कामात खबा न होये हे सर्व इस्माईलखानाकडे व बेगमेकडे उतर प्रतिउतराचा मार्ग ठीक करायाविशई बहूत विस्तारे आज्ञा लिाली हे सर्व कलवली परंतु मी शुज्यावदौलापासी गेलो होतो तेथे कांही दिवस राहून सर्वेच चर्या विचारिली व सविस्तर वर्तमान लिहून दोन कासीद वारंवा...सेवसी पाठविले आहेती पावले असतील व शुज्यादौलाचे शाहाणपण कळू आलेच असल सफदरजंग जिवंत असताच तो खराबहाल होता आता तर खुद धणी जाला अहे कोणाचेही...राहिले नाही व कोणासही मानीत नाही व इस्माईलखानाचे पुत्र दिलीहून आल्यावर रात्रदिवस...रांडा व दारू व गोसावियाची पोरे त्यासी बदफैली हेच काम करितो वरकड त्या...विचार व मनसुबा बाार गेला हा पोर बदमस्त आपले दिवस भरि...गुमराई व दौलत व फौज थोर थोर मनसुबा...राखायाची माणसे अलीक असताती जो अर्थ स्वामीचे ध्यानात आहे त्याला येक हा नाही व इस्माईलखान अक्षरशत्रू व उशड येसा [प्रका]र जाला आहे कोणास सांगावे व कोण येकतो... रीत तेथील असे थोडेसे राजश्री मलारबास जाण...वरकडास कांही समजत नाहीत प्रस्तुत रा ग...माजीपंत व माधवराव श्रीमंत राजश्री रघुनाथरावजीपासोन हथी व घोडा व दोन रकम जेवाहीर व वस्त्रे मातमीची नवाब शुज्यावदौलास वस्त्रे बेगमेस व सुनेसही वस्त्रे व इस्माईलखानास वस्त्रे घेऊन अले ते अयुधेस पावले सर्व पाविले त्यांस दोन हजार रुा उभयेतास मिलाले म्हणून पत्र रा बाबूरावजीचे व बखशीरामाचे आले असे बाकीचे पैशियाकरता उतर प्रतिउतर करिताती परंतु त्याची रीत जे आहे तेच असे म्हणून लिाले अहे माघोन जे होईल ते वर्तमान येईल सेवसी लिहून पाठवीन प्रस्तूत तरी शुज्यावदौला कांहीही कामाचा दिसत नाही पुढे जर ईश्वर कृपा करोन मार्गावर अनील तर येईल दुसरे माद कुलीखान चुलतभाऊ त्याचा प्रयागांत अहे तो त्याजपेक्षा खबरदार व शाहणा अहे [परं]तु द्रव्य नाही केवल खालीच अहे तमाम प्रयागचे काम खराब केले शहरांत लुटी व धूम [मोग]लिये करिताती व लोकास लुटिताती व हर रोजी [डा]के पडताती पंधरा दिवस जाले कज्यापुढेच डाका पडून दाह हजारा रुाच्या थैल्या मा[द]कुलीखानाचे सारऱ्याच नेल्या पाच सात माणसे मारिली व कोतवाल जखमी केला [ये]सा बंदोबस्त शहरांत व बाहेर विजेपूरचे जमीदाराने तेथील फौजदार लुटिला...वगैरे व हथी हिरोन नेला त्यास तंबी...खान मार प्रयागीहून...

ले. ११० } श्री {
पौ रखर २७ } पौ छ २७ राखर {

राजश्रिया विराजीत राजश्री बाबूराव गोपाळ गोसावी यांसि

सोक बापूजी माहादेव व दामोदर माहादेव नमस्कार उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशळ लेखन करणे यानंतर तुम्ही हजारीमलाचा मजकूर लिहिला तो सर्व ध्यानास आला त्यास त्याजपासून तो बेवकूफी शरी न जाली परंतु यामधें सरकारनुकसान जाले हे खरें तूर्त अवलियाखा सेंर जाला तरी तुम्ही दो हजारा फौजेनसी व दो हजारा बरकंदाजानसी येऊन पोहचणे सिरधनियांत राजश्री भगवतराव अनंत याजपासीही जमाव आहे तरी तुम्ही इकडील सर्व कामे सोडोन या गुलामाचे पारपत्य आगोधर करून मग सर्व सरंजाम तिकडे घेऊन जाऊन आपले काम करून घेणें या मनकुराविशई तुम्हाकडे मुजरद शुत्रस्वार रवाना केला आहे तरी पत्र पावताच स्वार होऊन जाणे इकडोन आम्हीही नवाब वजिरास बाहेर काढिले आहे दाहा हजार फौज व दाहा हजार बरकंदाज व सारा तोफखाना पातशाई घेऊन येका दो दिवसानी पार उतरोन याजला घेऊन येतो तुम्हीही सावधपणे असावे जर तुम्हास झेपावेसा असिला तरी तुम्ही व रा भगवंतराव व रा घोडाजी नाईक यैसे मिलोन येके विचारें मसलत ठराऊन मारून ठाणे [ घेणे * ] जर त्याची जबरदस्ती असली तरी तुम्ही कायम राहणे आम्ही वजिरास घेऊन येऊन निजामगड खनोन टाकितो परंतु तुम्ही पत्र पावताच स्वार होऊन जाणे विलंब सहसा न करावा जर तुमचे जेरदस्तीत असलिया मारून घेणे सलाह आहे परंतु बहूत सावधपणे काम करणे खर्चविशईस नाइकास लिहिले आहे तुम्ही आधी अधी सर्व कामे टाकून येऊन पोहचणे सलाह आहे पीलखानियाचा सरंजाम आणविला म्हणून लिा तरी उतम केले तुम्ही स्वार होऊन सत्वर येऊन पोहचणे [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ वा.* ] लेखना । वधिः

---

ले. १११ } श्री {
जवल १० }

श्रीमंत राजश्री [मो. जा.*] बापूसाहेब व राजश्री [ मो. जा.* ] दादासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक आपाजी त्र्यंबक सां नमस्कार विनंती येथील कुशल ता छ १० माहे जावल मुा आवळा स्वामीचे पुण्यप्रतापे येथास्थित जाणौन स्वक्षेम लिा आज्ञा केली पाहिजे विशेशे स्वामीचे पत्र १ छ २० माहे राखरचे आले ते छ २५ राखरीं सायेंकाली पावले लिहिले कीं श्रीमंत रा [ मो. जा.* ]

ले. ११३ } श्री {
जवल १५ पूर्वी

पु॥ श्रीमंत राजश्री [ मो. जा * ] दादासाहेब स्वामीचे शेवेसी

विज्ञाप्ति ऐसी जे पठाणरोहिलियासी अहवादे ताकीद करून दाब व अह वरचेवर दाखऊन स्वामीचे प्रतापे वाटेवर अणू त्यांचे पुत्र फौजेसहीत हजूर पाठविले अहेत पाऊन वृत श्रुत होईल छ १५ जीवल पावेतो हाफीज रहमतचा लेक पारीहून फौजेसहीत येईल तेच दिवसी अहमदखानाचाही पुत्र फौजेसहीत येथून सो रवाना होईल व वजिरासही घेऊन सत्वरच श्रीकृपेने येऊ हाफीज रहमत व अहमदखान खासे मात्र अपले स्थानसंरक्षणार्थ अपलाले जागा राहिले दुसरे अहमदखान अजारीच असतात व फिरंगी पातशा अयुधेकर व जाट हे पुर्ते याचे शत्रू जाले का की हे स्वामीचे जाले तेव्हा हरप्रकारे यासी तोडावे हे त्यास मंजूर होईल हे स्वामीपासी राहिले व येथे शत्रूनी अपला अमल केलियावर नाहरसिंगाचा न्याये होईल येसे कितीक अदेशें करून हे राहिले पुत्रांसहीत फौज समागमे देऊन छ १५ जमादिलावली सेवकास सो रवाना करणार श्रुत होये

---

ले. ११४ } {
जखर ७

पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब

...व मेहदी व कुलीखानाचे पत्राचें उतर आपण पाठविलेच नाही तर पाठऊन देणे व इसामुदीखानासही पत्र लेहून पाठवावे जे आर्जीचें उतरच न ये तर आम्हास तुम्हापासून आणखी तवके काये पातशाहाच आम्हावर रागे आहेत तर आम्हास तेथे यऊन सार्थक काये आम्ही तुमच्या कामाकरितां अवघ्यासी भ(भां)डतो व धांवत फिरतों मग हे वृथा असे येक पत्र खां मजकुरास पाठवावें भाव रुसव्याचे असे पत्र पाठवावें वरकड झेरडा वगैर गाव सरकारांत लागले व बुधी रोटी वगैर येथील जमीदार नजेबखानांने कैअद केले आहेत उगेच बैलाची चोरी केली म्हणौन तुफान लाऊन कैद कलेत व इसामुदीखानाने सतरावें तारखेस अथवा सताविसीं तारखेस स्वार होऊन लस्करास येणार आहेत ऐसी दोन मुहूर्तें आहेत सुज्यादौलाकडे जाण्यासी येणार त्यास अम्हास काये आज्ञा येथें रिकामे बसून कार्ये करावें जैसी अज्ञा होईल म्हणाल तर त्यांचे बा। लस्करांत येऊ आथवा आनूपशेहरी जाऊं परतु येथील खर्च जेबर येणार नाही पांचासातांचीसी सिबंदी दरमहा लागेल मी येथे आसल्यास देणे लागेल आथवा यांच्या बा।। लस्करास आलों तर दोनसें रुये पाहिजेत ऊद

वगैर सरंजाम पाहिजे खर्चस आसा प्रकार आहे याउपरी माहाराजाची अज्ञा होईल ते करूं सेवसी श्रुत होय बहूत काय लिहिणे हे विज्ञापना

सौवती वज्रचुडेमंडीत मातुश्री बाईसाहेब व ताईसाहेबाचे सेवसी सां नमस्कार कृपा लोभ असो देणे हे विनती

राजश्री वैज्ञापंत दाजी स्वामीचे सेवसी सां नमस्कार विनंती उपरी आगोघरचे बलवंतरायाबा शंभर रुपयाखाली आलों व वाटेत ऊट मेलें व केशो-नाबा तांबोल्यास रुये दिल्हे अैशे दोनतीनसें रुपयाखाली आलो आणि उगेच तनखा मजवरी करिता सांप्रत घोकलची पांचा रुपयाची केली व प्रभाकरास चालीस देणे यैशा तनखा करिता तरी मी कोठून देऊ नित्य खर्च चालवितां मजला पुरें होतें याजकरितां आपणांस लिहिले आहे हे विनती

---

ले. ११५ रजब ११ } श्रीवरद पौ छ २० रजब {

तीर्थस्वरूप माहाराज रा [मो. ना.*] नानासाहेब वडिलाचे सेवेसी

बालके बाजीरायाने चरनावर मस्तक ठेऊन सिरसां नमस्कार विज्ञापना यैसी जे येथील क्षेम ता छ ११ माहे रजब मुा बगला जाणेन वडिली आपले कुशळ हरघडी लिहिती आज्ञा केली पाहिजे विशेष वडिली छ ५ माहे रजबचे पत्र पाठविले ते छ १० माहे मा पावले लिहिले वर्तमान कलले त्यास काल संध्याकाली खलिता मै शुका व पत्रे सविस्तर वर्तमानाचे रा केले त्याजवरून सर्व कललेच आसेल वडिली सविस्तर श्रीमत स्वामीचे सेवेसी विनंती करून ज्याप्रा आज्ञा करतील त्याचे उतर लौकर पाठविजे व इकडील वर्तमान याप्रकारचे आहे की परवा दोन पलटन व गुर्जी बेग वगैरे दोन तीन सरदार घाटाकडे रा केले व आज दोन्ही गोसावियासही आज्ञा केली आहे की तुम्हीही जाणें त्यास येका दोन दिवसात तेही जातील व रोहिल्याचे पत्रे याच मजकुराचे आले होते की आमचे तर येणे त्या प्रांतास होत नाही यावे तर इकडे फौजा सरदाराच्या जवल व गंगा पायाब आम्ही तिकडे यावे व फौजा सरदाराच्या या पारी उतरल्यास मग आमचे बायकालेकरानी कोन्हीकडे जावें जर तुम्हास येणे आहे तर आपणच यावे आम्ही व तुम्ही मिळून भागिर्थी उतरून यासी जुजू न आलियास मग ज्यात आपले बरे असेल त्याप्रा केले जाईल व पेशजी पाटिलाचे पत्र याला आले होते त्याचा तपसील जे काही कलले होते त्याप्रा सेवेंसी विनंती लिहिलीच आहे त्याजवरून सविस्तर कलेल हाली आताही येक पत्र गोसावियास व खलिता मुख्यास आला आहे त्यास गोसावियाचा पत्र...येकाती आपणच वाचून पाहिला त्याच्या जबानी मजकूर कलला त्याप्रा लिहिला असे की पेशजी दोन तीन पत्रे तुम्ही

पाठविली ते पावली त्याचे उतर ही पा आहे पावलेच असेल व बाकी कितेक मजकूर तुमचा लटू दुबे यासी मुफसल सागितला आहे का की लिहियायात येत नवता त्यास त्याचे जबानी कललाच आसेल व न[वा]बास सागणे की तुम्ही यासी का दबता हे पुडे मालकाचे आहेत विसाजीपत तर येक ब्राम्हण आहे व होलकर निमाल्या विसाजीपंत रोहेल्यासी बहुता दिवसापासून नाखुसी ठेवीत होते परंतु जोपरियेंत म्या चितावर न आनिले तोपरियेंत काये जाले व होलकर त्याची तरफदारी करीत होते आखर म्या ज्या समई त्याचे पारपत्य इछिले तेव्हा उतमच प्रकारे पारपत्य कले व आताही ज्या कार्यास मी इछिनार नाही तो-परियेंत यासी काही होणें नाही त्यास नवाबाची खातरजमा करणें व आरज करणें की हे सरदार खुद काही नाहीत माहाराव व रा दादोपताचे बहकावल्यांनी बहकले आहेत त्याचा गुमास्ता तेथे आहे थाक दबकावणें व उतर साफ देवणें व नवाबाचे कूच लवकर या प्रांतास करवणें व वाटेत कायेही न आटकावे आटकलियास कामाचे नाहीं व शोहरत देणे की प्रथवीपतीकडे जातो जर हे आवाईनेच आपले देशाची वाट धरतील तर बरेच जाले नाहीतर (नाहीतर) मग पाहून घेऊ व जुजच जाला तर इकडून जाटासही व प्रथवी-पतीसही तुम्हात शामील करून किमपि चिता न करणे वरकड वर्तमान कितीक लटू दुबेस सांगितले आहेत त्याचे जबानी सविस्तर कलतील त्याप्रा नवाबास सागणे त्यास लटू दुबेस मुलाजमतीस आज पाच दिवस जाले की गोसावी घेऊन आला होता परंतु मुलाजमत न जाली त्यास गोसावी मजकुरानी नवाबाचे पत्र नवाबास गुजरानिले व आपले पत्राचा मजकूर वाचून दाख-विला व लटू दुबेच्या जबानीचा मजकूर सविस्तर आपणच सांगितला त्याचा जबानीचा मजकूर तर इतकाच ध्यानास आला की तुम्ही व फिरंगी व रोहिले येकचित होऊन याला मारून काहडणें पारचा मुलूक आमचा हालकरे वगैरे आम्ही तुम्हास इजारा देतो त्याचा पैका आम्हास देणें वरकड मुलूक इटावा वगैरे यात आपला आमल करून घेणे मग हे देशास गेलियावर येथील बदबस्तता आम्ही व तुम्ही मिळून करून घेऊ व याला म्हणजे मुख्यास पा होते की तुम्ही पत्र पा ते पावले लिहिला मजकूर सर्व कलला त्यास येक तर नुसता ब्राम्हण आहे व दुसरा काही काल नाही तुम्ही किमपि यासी न दबावे व सलुखाचे भाशन न करावे परंतु पै दर पै आले पाहिजे तुमच्या आवाइणेच हे गछय करितात...केलिया यासी जुंजू याचेही पारपत्य करणे कांही काम आहे व बहूत उतम केले की प्रथवीपतीस पत्र पा तोही दिलीहून बाहेर येत नाही व आताही त्यासी कागदापत्राची गरमी करणें व मीही त्याला लिहितो व लिहिलेही आहे सरदार तर काही काल नवते परंतु हे सारी खुटाई माहारावाची व दादोपताची आहे यानी सागसागून याला या गोष्टीवर आनिले आहे व त्यांचा गुमास्ता तेथे तुम्ही ठेवला आहे बरे आता त्याला दबावाच्या गोस्टी बाळणे व फारसा तोडी

न लावणें हाल करू कस्त करू न देणे व आपण कूच लवकर या प्रातास करणे मी कोन्हीही गोष्टीणें तुमसी बाहेर नाही व यासी काहीही होत नाही वरकड वर्तमा[न*] आनूपगीरास लिहिला आहे व लट्टू दुवेस सागितले आहे याजवरू[न*] सर्व कलेल इतका मजकूर वर मोठा सोषाणे ध्यानास आला वरकड काही कलले नाही की लिहावे मागून जे अनीक कलेल ते सेवसी विनती लिहिणं त्यास हे पत्र बजिनस श्रीमत स्वामीस दाखवावे याप्रा त्यानी लिहिले यास हे तर आता वाटेवरच आहेत परंतु या याप्रा त्यानी लिहिले त्याजवर हे सेवकासी त्या दिवसी त्याप्रा बालले त्याचा तपसील तर लिहिलाच आहे त्याजवरून विदीत जालेच आसेल यानी त्याचे उतर मा़ा लिहिले की तुम्ही पत्र पाठविले ते पावले व आनूपगीरास व लट्टू दुवेचा जबानी सागितले व लिहिले ते सविस्तर ध्यानास आले त्यास आम्हीही लवकर येतो काही गुंनता नाही आजी जुजायास आम्हीही भीत नाही व प्रथवीपतीसही लि[हि*]ले आहे त्यास प्रथम तर उतम तर हेच आहे की तुम्ही येमुनापार आपला मुलुकाचा बदोबस्ताचा नाव करून उतरून जाणे आथवा जाणे न होये तर दहा पंधरा कोसाचे तफावतने राहणें आनी जर हेही न कराल व त्यांतच शमील आसलियास आम्हाकडे शबद न ठेवणें जे त्यास लिहिणे तैसे येक तुम्हीही त्यात आहा मग ज्याला ईश्वर देईल तो घेईल याप्रा यानी उतर लिहिले आसे त्यास वडिली श्रीमतास हे वर्तमान पुर्ते निवेदन करावे जर यासी जुजणे इसेच आसेल तर उतम आहे नसलियास हाही माठा सरदार आहे श्रीमंत साहेबानी कोन्हासही मधे न आणता यासी श्रह वरचेवर समपदावे हा बहूत उपयोगी पडेल व श्रीमताचाच होईल दुसरियासी कोन्हासीही काही प्रयोजण ठेवणार नाही हे व ते येक जालियास बहुतच उतम आहे एक जालियास ज्याप्रा श्रीमंत वर्तवितील त्याचप्रा वरतेल यैसे आसलियास याच्या कोन्हीही गोस्ट ध्यानात न आनता खलित्याचे उतर पाठवावे की तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर सर्व कलला त्यास पहिल्यापासून आम्ही काही तुमच्या दोस्तीत आतर केला नाही हे तुम्हासही ठावकेच आसेल व मनोमै साक्ष आसेल परंतु मधेस्तेच भाशण मूल इतुके जाले की काहीही आजपरियेंत न ठहरले आताही आम्हास तुम्हाकडून काही आतर नाही तुम्ही किमपी चिंता न करणें ज्याप्रा मसोदा पा़ा त्याचप्रा आम्ही कबूल केला परंतु किर्तीक मजकुराची फोरखगी आम्हासही करून घेयाची आहे त्यास तुम्ही आपल्या कोन्ही मातबरास पाठऊन द्यावे त्याला त्याचप्रा लिहून देऊन याच्या मोहारास बलाऊन घेयावे व यासी श्रह ठेवावा हे उतम आहे पुडे मर्जी धनी समर्थ आहेत वडिली बजिनस पत्र दाखवावे व उतर सत्वर पाठवावे येकानती दाखवावे इसे न होये की हे वर्तमान त्याला जाईल व ते याला लिहितील मग सेवकास कठीन पडेल व आपनासही वर्तमान नये यैसे न करावे बहूत काये लिहिणे हे विज्ञापना

---

ले. ११६ } श्री {
रजब २०

राजश्री पुरुषोतम माहादेव गोसावी यासि

दं अखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य [ मो. जा.* ] स्नो मलारजी होलकर दंडवत विनंती उपरी येथील क्षेम जाणून स्वकीये कुशल लेखन करणे विशेष तुम्ही पत्र छ १७ रजबचे पा। ते छ १९ रजबी पावोन लेखनार्थ आवगत जाला पारच्या रोहिल्याची बातमी लिहिली ते सर्व कलली यैसियांसी येथील मजकूर तरी दिलीसभोंवता तमाम घेरा घालून रसद बद केली आहे इत्कियांवरी श्रीइछेन शत्रू लवकरीच पराभव पावेल तुम्ही आपले जागा बहूत मजबूत राहून हिमत बांधणें वरचेवर पलीकडील बातमी चांगली राखून इकडे पाठवीत जाणे [ नि.* ] जाणिजे छ २० रजब बहूत काये लिहिणें हे विनंती [ब.*] मोर्तब सुद [ पाठीवर हिंद १।२१ प्रा॰ शि* ] पा॰ छ २५ रजब

---

ले. ११७ } श्री मोरया {
रजब २४

चिरंजीव राजश्री पुरुषोतमपंत यासि

प्रति गंगाधर येशवंत आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले सर्व वृतांत ध्यानास आला मिरापुराकडील फौजेचा मजकूर लिहिला त्यास तो सर्व कळू अला तुम्ही तिकडे कासीद पाठवून बातमी आणून ठाणियात सावधपणे असत जावे येथील मजकूर तरी यजमानाच्या पत्रावरून कलेल [ नि. * ] रा। छ २४ रजब बहूत काये लिहिणे हे असीर्वाद पा॰ छ २५ रजब

---

ले. ११८ } श्री {
रमजान ११

पु॥ राजश्री गणपतराव बापूजी गोसावी यांसि

उपरी सुरजमल जाट माधोसिंगाकडे गेले आहेत उभयतानी विचार करून विजेसिंगास व रामसिंगास भेटीस बोलाविले आहे पुस्कुरस्नानाचे निमित्य करून माधोसिंग व सुरजमल जाण्हार तेथे भेटी होणार म्हणून लिहिले ते कळले ऐशास माधोसिंग व सुरजमल पुस्करास जाण्हार होते गेले न गेले त्याचा व याचा काये विचार जाला मनसुबा कोणता करितात ते मनास आणून वरच्यावर लिहीत जाणे जाणिजे [ नि.* ] छ ११ रमजान [ नि.* ] बहूत काये लिहिणे [ ब.* ] लेखन सीमा पा॰ छ १८ शवाल

---

ले. ११९ } श्री {
शव्वाल ७

श्रियासह चिरंजीव रो नानासाहेब यांसि

प्रती बापूजी माहादेव कृतानेक आसीर्वाद उपरी येथील कुशल तो छ ७ शवाल मु॥ इंद्रप्रस्त जाणून स्वकीये कुशळ लिहीत जाणे विशष तुमची पत्रे छ २९ रमजानची आलीं तें पावली नवाबची पत्रे नवा[बा*]कडे रो केली उतर आलियावर पाठऊन यानंतर नवाब नजीबदवले मौजे बरसत येमुनेचे कांठी आहे त्यावर आम्ही सुभेदाराचे लि॥ माफक नवाबास सांगितले की तुम्ही इकडून कूच करूण ऱ्होडल पलवलचे मार्गे चालावे त्यास नवाब म्हणू लागले जे जे कांही सुभेदाराणी लिहिले आहे त्याप्रा होऊन येईल दुसरें परस्परें सुभेदाराची फर्मास येते त्यास तुम्ही तेथे असतां फर्मासी परभारें येतात त्यास जे कांही फरमास होत जाईल ते आम्हास लि॥ जाणे आम्ही ताकीद करून पाठवीत जाऊ कदाचीत ते न लहीत तरी तुम्ही आम्हास सूचणा लिहीत जाणे तेथे मुनसी पत्रे लिहीत आसतात त्यासही सागणे की आमचेंही नांव लिहीत जात यानंतर नवाब आबजलखा येथे किल्यांत आहेत नवाब नजीबदवले येथे ठेऊन गेले आहेत यानीही श्रीमंत रा सुभेदारांस पत्र लि॥ आहे तें पाठविले आसे याचे उतर घेऊन पाठवणे दुसरे नवाब नजीबदवले यांची तबियेत कहाली आहे जुलाब घेतला आहे फुरसद जालियावर सुभेदाराचे लि॥ माफ करतील दुसरें तुम्ही औशधाविशई व केशराविशई लिहिले त्यास सोबत मातबर पाहून औशधे वगैरे रो करूण [नि*] तुमचे दुश्मनाचे शरीर काहिले होतें म्हणून यैकिले होते त्यासी श्री तुम्हास उतम प्रकारे राखो सदैव कुशलतेचे वर्तमान लिहीत जाणे बहूत काय लि॥ लोभ असों दीजे औषधें वगैर मागाहून पाठऊ श्रीमंत सुभेदारांची... व पालखी याची फर्माविश नवाबास आली त्यासी आमचे हातून येविसीचे पत्र पाठविलें असते तरी लौकिकांत भ्रम राहता बरें अमचे सर्व प्रकारें चालवणे श्रीमंतासच आहे बहूत काय लि॥ हे अंसीर्वाद

सो लक्षुमीबाईंचे व गोपिकाबाईंचे आसीर्वाद विनंती सो देवाजी गोपाल कृतानेक सो नमस्कार ठाकूरदासाचा रामराम

---

ले. १२० } श्री {
शव्वाल १५

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव गोसावी यांसि

श्रा मल्हारजी होलकर दंडवत विनंती उपरी ग्वालेरच्या सावकार घासीराम याचे कर्ज साडे आठ हजार कर्मुलाखान याजकडे व पटपटगजाच्या मामलतीबा

तेरा हजार येकूण साडे येकवीस हजार कर्मुलाखानाकडून येणे याच्या वसुलास सरकारचे सात स्वार होते त्यास वजीर करमुलाखास घेऊन गेले आणि बदकच्या-कडून स्वार उठविले म्हणून कळू आले तर वजिरास चार गोष्टी सागून साडे येकविसा हजाराची कर्मुलाखानापासोन वट करून घेणे सरकारच्या स्वारास रोजीना खान मजकुराकडून आदा करवणे रा।। छ १५ शवाल [ नि.* ] बहूत काये लिहिणे हे विनंती [ब.*] मोर्तब सुद पा। छ १४ जिल्हेज

---

ले. १२१
शव्वाल १७ } हू {

अजम रामाजी मल्हारजीऊजी र्द्र कर्दहू मुकाम पुण्ये

र्द मजमूए फिरासत येकज्येहती निशा [मो. जा.*] बाआदज शौक लिकाये फरहतअफजाये अंकी छ १० सवालचा तवदुदनामा व इनायेत-नामा हुजूरचा इब्लाग केला तो छ १४ मिनहूसी दोन प्रहरी येऊन मोसूल जाहाला त्याचे मजमूनावरून दिलास खुसी व शादमानी विसियार रूयेदाद होऊन आली सुभासुभास ताकीदपत्रे व मोहबतनामा अजम जिंनरालजी बदर मुबई यासी हुजुरून हासील करून फिरिस्ताद केला बायेश ज्यजती मेहर-बानगी [ जाली* ] अमा जिंनरालजीचे पत्राचा मजमून बिलकूल ई ज्यानेबास माळूम होऊन आला नाही अजी सबब त्या मजमूनाचा इतिला देणार आ फिरासतनिशा कदीम मुखलिस मेहरबान खैरख्वा ई ज्यानेबाचे असत म्हणोन कलमे केले असे जे अजम जिनरालजी यांचे तर्फेहून कितेक जाबस्वाल घरोबि-याचे होत असेत अवल येक खत जिनरालजीकडून ई ज्यानेबास आले त्याची नकल हशमतपन्हा अजम नाना फडणीस याचे नजीक रवाना जाहाली असे त्याचें जाबाची इंतिजारी ठेवीत असो लिहाजा खत जिनरालजीचे तूर्त मव-कूफ करून जलदीने हरकारा रवाना केला असे तर हरकारा पोहचतांच खताचा जाब व जिनरालजीचे खताची नकल वजलद येऊन पोहचे असे करणार आ मेहर-बां असेत हुजूरमधे गलबताकरिता लिहिलेच असेत आपण श्रीमंताभजीक समजाविश करून गलवतें बमै सरंजाम तोटे वगैरा रसीद जाहालियासिवाये चोरटे-याचा बंदोबस्त होऊन येत नाही खुशखीचा बदोबस्त करणे तो केला असे अमा जलमार्गाचा बंदोबस्त गलबतावाचून राहिला असे याकरिता ई ज्यानेब खोखरीस जावयाचा अंदेशा दर्पेश राखत असो दारूगोली पाच्यां हजारात देणार म्हणोन अजम इसमाईलखान याही तसदीर केले त्यास पांचा हजारात सरकार सिरिस्ते-याणी सरजाम द्यावा आण सरकारातून यामोजीब अनायेत व्हावा हे ई ज्यानेबांस मवाफी यांवे हे तर वेहतर माळूम अगर ते पाच हजार रुपये रोकड नख्त हाली

आले तर दारूगोळी वगैरा सरंजाम युतीने केला जाईल जादा काये लिहिणे रवाना छ १७ माहे सवाल हे कितावत

---

ले. १२२
जिल्काद १६ } श्रीवरद {

तीर्थस्वरूप माा राजश्री [ मो. जा. * ] तात्यासाहेब स्वामी वडिलाचे सेवेसी

बालके बाजीरायाने चरनावर मस्तक ठेऊन सिरसां नमस्कार विनंती येसी जे येथील क्षेम ताा छ १६ माहे जिलकाद मुाा लस्कर नजीक बिलग्राम भागिंथी उतरतीर कनोजेहून सा कोस जाणेन वडिली आपले कुशल दरवडी लेखआज्ञा केले पाा विशेष बहुता दिवसानंतर कृपा करून आसीर्वादपत्र व तीर्थस्वरूप साहेबास पत्र पाठविले ते धैकल मिर्धा लखनऊस होता त्यानी तीर्थस्वरूप साहेबास काल्पीस पावता केला तदनंतर सेवक लखनऊस गेला त्यावर तीर्थस्वरूप साहेबाचे पत्र वडिलाचे नावे आला तो पत्र व बालकानी आपला पत्र छ १ जिल्कादचा डाकेत पाठविला तो सेवेसी पावला आसेल त्याजवरून सर्व वर्तमान विदीत जालेच आसेल हाली छ ३ माहे हालचे नवाब वजीर कुच करून सर्वो स्वारीनी कंपूस आले येथे आलियावर करनेल साहे [बाह]नी मेजमानी केली दहा खान वस्त्राचे व येक किस्ती जवाहराची नजर केली दुसरिया दिवसी नवाबानी त्यांची मेजमानी केली यानीही पाच खान पारचे व दोन किस्ती जवाहीर दोन घोडे व येक हती दिघला दुसरिया दिवसी तेलग्याची व तोफखानियांची येकंदर तमास पाहायास बोलाविले तिसरिया प्रहरपरियेंत पाहू पाहून डेरियास दाखल जाले छ १४ त्याचे येथे मोठा दिवस म्हणवितो तो जाला नजफखानाचा वकील मिर्जा खलील येथे पाचसे रावतानी हाजर आहे जावसाल हाच की मिर्जा सहादत आलीस काही मुलूक देयावे त्यास यांचे खातरेस हे गोस्ट येत नाही दोन्ही गोसावी वरकड आनीक रिसालदार व पल्टन वगैरे फौज जे येथून बरतरफ होते ते तेथेच नजफखानापासी व मिर्जा सहदत आलीपासी जमा होत जाते व प्रधानपतीचीही कृपा सहादत आलीवर फार आहे पहावे काये ठहरते परंतु पूर्वीस यासीच खुश आहेत यानी सारे घरबार त्याचेच स्वाधीन केला हैसा दुसरा कोण मिळेल की इतकी तावेदारी करील नवाब छ २१ [illegible] लखनऊस [illegible] व जान विस्ट साहेबाची कलकत्याहून बदली जाली मिस्तर [illegible] फिरंगी आहे तो येतो मुंगेरीस पावलियाचे वर्तमान आहे तो [illegible] मग हे जातील नवाब नजफखान साहेबांचा [illegible] दिलीस जाणार होते परंतु मामलत बिगडली [illegible] आनुपगीरास मोरच्यांत गोळी पायांत लागली आजुनी [illegible]

ःफकुलीखान नजफीखानाचा चेला दहा हजार फौजेने सुनपताचे आलीकडे
चा कोसावर आहे आमरसिंग आला जाटाचा मूल व जाबतेखान सुनपताचे
ीकडे आहेत नबफकुलीखान जुझायास सिध आहे न [जि *]फखान लिहून
ठ...जोपरियेंत मी न ये तोपरियेंत न जुजवे व ( व ) आला जाटाचे मुलासी
नफखानासी पगडीबदल भाईचारा आहे यामुळे त्याचीही मर्जी जुझायाची नाही
ाबदुलआहदखानाची मर्जी आहे की आपसांत दोघानी जुझावे दोघातून जोच
रला जाईल ते सरकारकिफायत आहे पहावे काये होते वडिली आशीर्वादपत्र
ठविले ते तीर्थस्वरूप साहेबी सेवकाजवळ पाठविले आशा की आम्हास व
र्थस्वरूप साहेबास व देशास श्रीमंत साहेबास वरचेवर समाच्यार लिहीत जाणे
सरवास राजी राखणे की पुढे तुमची कारेगरी द्रिष्टीस पडे व बजाऊन दाखवा
ास आम्ही काये बजाऊन दाखवने आहे जो आहे तो प्रताप धन्याचाच आहे
ामसी जे चाकरी जाली ते केली अताही धन्याचा हृय मस्तकी आसलियास
ेच होईल श्रीमत पंतप्रधान साहेबास व श्रीमंत तुकोजीबाबास व पाटील-
ाहेबास पत्रे पाठवली आहेत व वडिली पाहून पुडे रा करावी बहूत......हे
ज्ञापना श्रीमंत बापू.....नानास पत्र पाठविले आहे ...पावतील

---

. १२३ } श्री {
ाल्काद २९ } जिल्काद २९ {

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री दामोदरपंत स्वामीचे शेवेसी
पो बालाजी जनार्दन सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून
स्कीय कुशल लिहीत जावे विशेष तुम्ही छ ७ सवालचे पत्र पाठविले ते पावले
वाब वजिराची भेट जाली आपले कडील खुषीचे वर्तमान पुसले बहूत स्तूत
रीत होते नजरेचा सरंजाम आणिला होता तो गुजरा...बगे याणी दस्त...चा
ाय आहे ते लिहून पो रा छ २९...बहूत काय लिहिणे लोभ असो दीजे हे
वनंती

---

. १२४ } श्रीवरद {
जिल्हेज १२ } {

सो पुरुषोतम माहादेव कृतानेक सां नमस्कार विनंती उपर येथील क्षेम
ाा छ ११ जिल्हेज मुा सांडी नजीक फरुखाबाद पंधरा कोस जाणून स्वक्षेम
लेहावयास अज्ञा केली पाहिजे विशेष इकडील सविस्तर. वृत सो विनंती लिा
ाली छ मजकुरी संध्याकाळी वजीर अमचे डेरियाजवळ अले बोलाविले
तेव्हा भोजन सोडून त्याची भेट घेतली दोन तीन घटका उभे राहिले व अम्हासी

गुह्यार्थ बोलिले तो पुर्वणीपत्रावरून कळेल मु [ ख्य ] गोस्ट बोलिले की जो करार सरदारानी येरचखानासी केला अहे तो सत्य होईल त्याचे उतर अम्ही दिधले की जलदीने अपणाकडून अमलांत अल्यास अंतर किमपि होणार नाही अजवर कायम राखून तुमचे बरे करावयास्तव श्रीमती व रा पा [ टील ]साहेबी फते जाली असतां अंतर करीत नाही तेव्हा बोलिले की [ ये ]रचखानास सत्वरच तुम्हासमागमे मार्गस्त करावयास जरनैलास सागितले अहे हे भाषण जाल्यावर अपण जो मजकूर लिहिला होता तो शृत केला त्याउपर...ले की त्याचे पोख्तगीवर अमची खातरजमा अहे येथे येक दोन...अहे पुढे ठैरेल ते लिहू विस्तारे लिहिता नये सविस्तर भेटीनंतर शृत करू तात्पर्य पुर्वणीपत्री लिहिले अहे ते चिरजीव खंडेराऊ दौलतभाऊ वाचून दाखवील रा पाटीलबावासही शृत करावे येक मजकूर यास्तव निराळे त्यांस न लिहिले हेच विनंती त्यांस शृत करणार अपण समर्थ अहेत [ कृ ]पा केली पो दर्शनलाभ होये तो सुदीन हे विनंती वजिराचे...पावेतो जाऊन तेथून स्वारीतूनच अज्ञा घेऊन अपले डेरियास यावयास लागलों तों मार्गी येरचखानाचा डेरा होता तो दोन दिवस जाले कीं अमचे डेरियास अला होता यास्तव त्याचे डेरियास गेलो तेथे अनुपगीर बालाराव पुरुषोतम जैरामही होते त्यासही ताकीद व जलदीस्तव सर्वांचे समक्ष सागितले त्यानीही अपले येकनिस्टतेचे वर्णन केले व नवाबाचे भेटीचा मजकूर अम्ही जाला तो वर लिोप्रा सागितला गोसावी येरचखानानी चौ दिवसाचा वायदा केला अहे की जर चौ दिवसांत काही न जाले तर तुम्ही मनास येईल ते सरदारांस लिहावे व कूच करून जावे याप्रो च्यार घटका तेथे सरकार कामाची भाषणे जाली येरचखान बोलला की ईस्वरइछा अहे तर रा पाटीलसाहेबाची याची येकदा भेट करून देतो जरनैलानेही परवाणगी येरचखानास अपणाकडे जावयाची दिधली अहे म्हणतात अमलात येईल ते विनंती लिहू श्रीच कृपा करो कृपा केली पो दर्शन घडे ते सुघडी हे विनंती च्यार महिने जासूद न अला छ १२ माहे मजकुरी रा बहिरजीबावा डेरियासि येऊन दया केली पुढेही संधान सरकार उपयोगी रक्षून सर्वांचे मत्ते होईल ते विनंती लिहू कृपा केली पो हे विनंती

# सूची

भा. इ. सं. मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६१

# हिंगणे दफ्तर १ ला खंड

## मराठ्यांच्या दिल्ली येथील वकिलातीचा पत्रव्यवहार

संपादक—श्री. ग. ह. खरे

पृ. १९०, किं. तीन रुपये

या पुस्तकांत थोरले बाजीराव, बाळाजी बाजीराव, सदाशिवराव भाऊ, रघुनाथराव, शिंदेहोळकर व त्यांचे दिवाण, महादेवभट हिंगणे व त्याचे चार मुलगे इत्यादि पूर्व पेशवाईतील अनेक प्रमुख व्यक्तींचा पत्रव्यवहार आला असून तो तत्कालीन राजकारण समजण्यास अत्यंत उपयुक्त आहे.

---

भा. इ. सं. मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६७

# महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख

संपादक—डॉ. मो. गं. दीक्षित, पीएच्. डी.

पृ. १३३, किं. तीन रुपये

या पुस्तकांत इ. सनाच्या ५–१३ या शतकांतले चार ताम्रपट व सहा शिलालेख असून हीं सर्व साधनें कांहींना कांहीं नवीन माहिती पुरवीत आहेत. मध्ययुगीन इतिहासांतील अनेक मुद्यांवर या साधनांच्या योगानें अभिनव प्रकाश पडत आहे.

---

भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ७०

श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर स्मारक ग्रंथमाला क्र. १

# हिंगणे दफ्तर

## २ रा खंड

# भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला

* हा ग्रंथ मुंबई सरकारच्या प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयांसाठीं मंजूर. § हा शैक्षणिक ( training ) संस्था व शिक्षकग्रंथालयें यांसाठीं मंजूर. ¶ हा ग्रंथ त्रैमासिकांत भागशः प्रसिद्ध झाला. ४०–४२,४६,४८,५१,५३ स्वतंत्र मिळतात.

१ अहवाल (शके १८३२) ३
२ ,, (शके १८३३) ५
३ सुवंत विचार(कै. वि. का. राजवाडे) १०
४ वार्षिक इतिवृत्त (शके १८३४) ५
५ मरा. इति. साधनें खं. १२ १०८
*६ प्रथम संमेलन वृत्त(शके १८३५) ०१२
*७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३५) ६
*८ द्वितीय संमेलन वृत्त (शके १८३६) ३
*९ वार्षिक इतिवृत्त (शके १८३६) ३
*१० मरा. इति. साधनें खं. २० ३
*११ वार्षिक इतिवृत्त (शके १८३७) ६
*१२ तृतीय संमेलन वृत्त (शके १८३७) ३
*१३ मुकुंद–महाभाष्य (संस्कृत) ०८
*१४ ग्रंथराज (दासोपंत) ०८
*१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला ०१२
*१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा ०१२
*मंडळ–त्रैमासिक प्रत्येक पुस्तक ३
*१७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३८) ३
१८ चतुर्थ संमेलन वृत्त (शके १८३८) ३
१९ राजवाडे–खंड–स्थलसूची ४
*२० पंचम संमेलन वृत्त (शके १८३९) ३
२२ चंद्रचूड–दप्तर–कुला १ ३
२३ महाराष्ट्र–सारस्वत (संपलें) १०
२४ षष्ठ संमेलन–वृत्त (१८४०) ४
२५ सप्तम संमेलन–वृत्त (१८४१) ३
२६ संशोधकाची छोटी जंत्री ०४
२७ प्रदर्शन परिचय ०४
*२८ फारशी पत्रव्यवहार ५
२९ फार्सी–मराठी कोश ४
३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला १०८
३१ Historical Miscellany १
३२ पुरंदरे–दप्तर भाग १ ४
३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा ४
३४ द. मध्ययु. इ. साधनें खं. १ २
३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं. १ २
३६ राजाराम–चरितम् १०८
३७ मंडळांतील नाणीं १
¶३८ शिवचरित्रसाहित्य खंड ४ १०८
३९ गोवळकोंड्याची कुत्बशाही रु. ४
¶४० ऐति. फार्सी साहित्य खं. १ १०८
¶४१ दक्षि. मध्ययु. इ. सा. खं. २ रु. २
¶४२ ऐतिहासिक संकीर्ण सा. खं. २ १०८
४३ मंडळ चित्र ग्रंथ चित्रें २० ०८
४४ शिवकालीन पत्रसारसंग्रह खं ३ २०८
§४५ विजयनगर स्मारकग्रंथ ४
¶४६ ऐतिहासिक फारसी सा. खं. २ १०८
¶४७ शिवचरित्रसाहित्य खं. ६ १०८
¶४८ मराठी सत्तेचा उत्तरविस्तार ०१
¶४९ शिवचरित्रवृत्तसंग्रह कानडी
५० शिवचरित्रसाहित्य खंड ७ १०
¶५१ ऐति. फार्सी साहित्य खं. ३ १०
५२ } शिवचरित्रवृत्तसंग्रह २ व ३
¶५३ } फार्सी विभाग प्रत्येकीं १०
५४ पुणें नगर संशोधन वृत्त खंड १ रु.
५४ अ ऐ. संकीर्ण साहित्य खं. ३ ३
५५ शिवचरित्रसाहित्य खंड ८ १०८
५५ अ शि. च. सा. खं. ५ ३०८
५६ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ४ २
५७ ऐ. संकीर्ण वाङ्मय साहि. खं. १. १०८
५८ शिवकालीन दंडनीति ३
५९ पुणें नगरसंशोधन वृत्त खं. २ १०८
६० ऐ. संकीर्ण निबंध खं. १ १०८
६१ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ५ १०८
६२ शिवचरित्र साहित्य खंड ९ १०८
६३ हिंगणे दप्तर १ ला खंड ३
६४ ऐ. सं. साहित्य खं. ६ १०८
६५ ऐ. संकीर्ण निबंध ३ २
६६ पुणें नगरसंशोधनवृत्त खं. ३ १०८
६७ महाराष्ट्रांतील कांहीं ताम्रपट व शिलालेख ३
६८ ऐ. संकीर्ण साहित्य खंड ७ २
६९ ऐ. संकीर्ण निबंध खंड २ २०८

भारत इतिहास संशोधक मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ७०
श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर स्मारक ग्रंथमाला क्र. १

# हिंगणे दफ्तर

## २ रा खंड

संपादक
श्री. गणेश हरी खरे
क्युरेटर, भा. इ. सं. मंडळ, पुणे

यशोदा-चिंतामणि-निधि, कै. द. वि. आपटे स्मारक मंडळ,
श्रीमंत सरदार चंद्रोजीराव आंग्रे व श्रीमंत सरदार विंचूरकर
यांनी पुरस्कार केलेले

# आंग्रेकालीन अष्टागर

संपादक

**श्री शां. वि. आवळसकर, अलीबाग**

या ग्रंथांत पश्चिम किनाऱ्यावरील सागरी युद्धें, राजनैतिक इतिहास,
सामाजिक घडामोडी इ. बहुविध भरपूर माहिती विवेचक
प्रस्तावनेसह प्रथमच पुढें येत आहे. किं. रु. ५
मंडळाचे सभासदास ४-८-०

प्रती संपादकाकडे अलीबाग येथें
अगर
**भा. इ. सं. मंडळांत मिळतात**

मुद्रकः-ज. ग. जोशी, जनार्दन सदाशिव लि. चा प्रेस, ३९४ सदाशिव पुणें २.
प्रकाशकः-श्री. चिं ग कर्वे-चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें २.

श्रीमन्त कै. बाबासाहेब घोरपडे

इचलकरंजीकर



# प्रस्तावना.

हिंगणे दफ्तराच्या पहिल्या खंडाचे प्रस्तावनेंत यांतील बरींच पत्रें कोठून, व्हां व कशा तऱ्हेनें निवड करून आणिलीं तें लिहिलें आहे. तदनंतर श्री. पां. . ऊर्फ भय्यासाहेब हिंगणे यांनीं आणखी कांहीं नवीन कागद सापडले असून पहावयास येण्याविषयीं कळविल्यावरून इ. १९४७ च्या जानेवारी महिन्याचे वटच्या आठवड्यांत मी तिसऱ्यानें चांदोरीस गेलों आणि चार दिवस कागदपत्र ाळून सुमारें एक हजार कागद अधिक अभ्यासासाठीं येथें घेऊन आलों. जुने ाक उत्पन्नाविषयींचे कागद त्यांच्या दृष्टीनें महत्वाचे असल्यानें सुरक्षित रहावे ्हणून लाकडी किंवा धातूच्या नळकांड्यांत घालून ठेवीत. अशीं कांहीं नळकांडीं व्यानें सापडल्यामुळें श्री. हिंगणे यांनीं मला बोलाविलें. त्याप्रमाणें सुमारें वीस ळकांड्यांतील २५०।३०० फार्शी व मराठी कागद मीं तपासले. त्यांतील कांहीं ्हिंगण्यांचें पूर्ववृत्त समजण्यास उपयोगी आहेत. सामान्य इतिहासास उपकारक ासे कागद त्यांत फारसे आढळले नाहींत. परंतु या वेळीं श्री. भय्यासाहेब ाांवांतील आपल्या वाड्यांत रहात होते. त्यांनीं तिसऱ्या मजल्यावरील कागदपत्र ाहण्याविषयीं सुचविलें. दुसऱ्या खेपेस चांदोरीस गेलों असतां या मजल्यावरचे ाागद मी चाळले होते. पण दरम्यानच्या काळांत कांहीं जुने कागद नव्यानें तेथें ाकले गेले. हे कागद दोन दिवस तपासल्यावर विशेष कांहीं सांपडत नाहीं म्हणून मीं, श्री. भय्यासाहेब आपल्या स्वभावास अनुसरून तेथें राहण्याचा ार्दिक आग्रह करीत असतांही, तिसरे दिवशीं दुपारीं परतण्याचें ठरविलें. पण त्या दिवशीं डबडब वाजणारी जमीन तिजवरील अडगळ व केरकचरा बाजूस करून कागदांच्या आशेनें उचकली. • तेव्हां भिजल्यानें कमीजास्त प्रमाणांत भाकरीप्रमाणें एकजीव बनलेल्या कागदांची कांहीं पुडकीं खरोखरच आढळलीं. पैकीं अगदीं निकामी झालेलीं तेथेंच ठेविलीं व ज्यांतून थोडेसे तरी कागद सोडवून काढतां येतील अशी आशा वाटली तीं येथें मंडळाकडे घेऊन आलों.

येथें आल्यानंतरचें पहिलें काम म्हणजे भाकरी बनलेल्या पुडक्यांतून कांहीं कागद हातीं लागतात कीं काय तें पहाणें हें होतें. मी अनेकांच्या तोंडून वाफेच्या योगानें कागद सुटे करतां येतात असें ऐकिलें होतें, म्हणून प्रथम वाफेचा प्रयोग करून पाहिला. मला त्या प्रयोगाचें तंत्र माहीत नव्हतें म्हणा किंवा तो प्रयोग निसर्गतःच अशक्य म्हणून म्हणा; पण मी वाफेच्या साह्यानें कागद सोडवूं शकलों नाहीं. वाफेवर कागद धरला तर कांहींसा नरम होतो. पण एकतर दोन कागद विलग होण्याइतका नरमपणा येत नाहीं. शिवाय वाफेवरून बाजूस करतांच वाफेच्या आंगिक उष्णतेनें कागद तात्काळ कडक बनतो. यामुळें कागद निराळे करणें शक्य होत नाहीं. यापेक्षां माझी पद्धति अधिक परिणामकारक आहे असें आढळलें. मी कागदांच्या चवडीभोंवतीं एक पातळ परंतु जलशोषक कागद गुंडाळून त्यावर चबचबीत ओलें फडकें गुंडाळतों. मग फडक्यासकट ती

चवड कांहीं तास दाबाखालीं ठेवतों. यामुळें कागद दमट बनून उकलतां येतात व उकलण्याची क्रिया पुष्कळ वेळ चालली तरी ते वाळत नसल्यानें प्रयोग यशस्वी होतो. या पद्धतीनें मी पूर्वी पुष्कळ कागद व पोथ्यापानें विलग केलीं आहेत. या वेळींही कांहीं कागद या पद्धतीनेंच हातीं लागले. पण पुष्कळ पूर्णपणें एकजीव झाल्यामुळें सुटले नाहींत. अर्थात् तेवढ्या कागदांस इतिहासाभ्यासी अंतरले. या कागदांत जयपूर–मराठे संबंधावर प्रकाश पाडणारे बरेच कागद असावे असा माझा तर्क आहे. यामुळें हानी विशेषच झाली आहे. पण हळहळण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

यापुढील काम म्हणजे नकलण्याचें. हें मुख्यतः मलाच करावें लागलें. पण यावेळीं नकलण्याजोगे मराठी कागद संख्येनें फार नव्हते. यामुळें नकलांचें काम लवकरच आवरलें.

पुढील काम तारखा ठरविण्याचें. हें काम जितकें महत्त्वाचें तितकेंच जिकिरीचें आहे. याची थोडीशी कल्पना मी पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत दिली आहे. व्यक्तिशः माझी या कामांत पुष्कळ प्रगति झाली. शकावलीच्या स्वरूपाच्या पुष्कळ तारखा मीं एकत्र केल्या. पुष्कळ मृत्युतिथीही एकत्र जमविल्या. पण प्रकाशनाच्या घाईमुळें अभ्यासूंच्या उपयोगासाठीं त्या येथें देणें शक्य झालें नाहीं. नाहींतर त्या अभ्यासूंना मजप्रमाणेंच उपयोगी पडल्या असत्या.

याच दप्तराच्या पहिल्या खंडांत केवळ पूर्वपेशवाईतील २१९ पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. पण अनवधान व अनभ्यास यामुळें त्या काळांतील कांहीं पत्रें त्या खंडांत घालावयाचीं राहिलीं. तीं, नव्यानें मिळालेलीं पण पूर्वपेशवाईतील कांहीं, उत्तर पेशवाईतील आणि ज्यामधील अर्धवट कालनिर्देशावरून तारखा निश्चित करतां येत नाहींत, अशीं सर्व पत्रें ( १२५ ) या खंडांत समाविष्ट केलीं आहेत. बापूजी महादेवाचीं कांहीं पत्रें अशीं आहेत कीं, तीं या दोन खंडांत समाविष्ट व्हावयास पाहिजेत. पण अक्षर अतिशय दुर्बोध असल्यामुळें त्या पत्रांच्या नकला करण्यांत फार वेळ जातो. यामुळें बापूजी महादेवाचीं कांहीं पत्रें अजून तशींच राहिलीं आहेत. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत मी लिहिलें आहे कीं, या दुसऱ्या खंडांत २५०।३०० पत्रांचा समावेश होईल. पण कांहीं पत्रें वर सांगितल्याप्रमाणें अजून नकलावयाचीं आहेत. उलट हा खंड सुमारें १२५ पानांचाच काढावयाचा ठरल्यामुळें अदमासें चाळीस पत्रांच्या नकला तयार असून तीं या खंडांत घालण्याजोगीं होतीं तरी बाजूस ठेविलीं. शिवाय मराठे–इंग्रज हर्षामर्षकाळांतील मराठी व फार्सी पत्रें आहेत तीं वेगळींच. या सर्वांचा तिसऱ्या खंडांत समावेश होऊन तोही यथावकाश प्रकाशित होईल.

या खंडांत ज्यांच्या तारखा ठरवितां आल्या नाहींत अशीं २५ पत्रें छापिलीं असून त्यांविषयीं दोन शब्द लिहिणें आवश्यक आहे. कोणतेंही जुनें ऐतिहासिक पत्र घेतलें तरी त्यांतील निर्दिष्ट व कार्यकारी व्यक्तींपैकीं एक किंवा अधिक

व्यक्तींचे मृत्युदिन आपणांस ठाऊक असणें शक्य आहे. पण तेवढ्यानें प्रायः कांहींच होण्यासारखें नाहीं. उ. नजीबखानाची मृत्युतिथि १७७० आक्टोबर २८ किंवा ३१ होती येवढें समजल्यानें ज्या पत्रांत नजीबखानाच्या हालचाली वर्णिल्या आहेत त्या पत्रांचा काल कसा ठरणार ? त्यासाठीं त्या हालचाली केव्हां झाल्या तें इतर पुराव्याच्या साह्यानें ठरविलें पाहिजे. तो पुरावा मला माझ्या सवडीनें झालेल्या अभ्यासांत नीट आढळेना. म्हणून केवळ अंदाजी तारखा न देतां पत्रें तशींच छापणें मला प्रशस्त वाटलें. अभ्यासक स्वतःच्या कल्पनेप्रमाणें त्यांच्या तारखा बसवूं शकतील किंवा अधिक सवड सापडून मला बसवितां आल्या तर मीच बसवून पुरंदरे दप्तर पहिल्या खंडाच्या दुरुस्त तारखा प्रकाशित केल्या तशा प्रसिद्ध करीन.

या खंडांत आलेल्या पत्रांचें वर्गीकरण असें—

गोपाळराव गणेश २२
गोविंद तमाजी व धर्मराव तमाजी ५, ८,१८,२४–३०,३५
गंगाधर यशवंत चंद्रचूड ४४,११७
चिंतो कृष्ण ४४
जयाजी शिंदे ३१,३६
नाना फडणीस ९६,१२३
पेशवे–माधवराव बल्लाळ ४८,५८,६३, ७३,७७,८२,८३
– रघुनाथराव ३२,३३,४७,५१, ५२,५५,५९,६०,६४,६५,६८ ६९,१०२,१०८,११८ ?
– सवाई माधवराव ९०,९५
यशवंत बाबूराव ३७,३८
रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण ७१,८१
संकीर्ण ३,४,६,१६,८६,८९,९२,९४, ९७,१२१
सखारामबापू ३४
सवाई जयसिंघ १,२
हिंगणे–गोविंद पुरुषोत्तम ११२
–दामोदर महादेव ९,१२–१५
–देवराव महादेव ७२, ८५
–पुरुषोत्तम महादेव २०,५३, ७९,८०,८७,८८,१२४
–बापूजी महादेव १०, ११, १७,१९,२१,२३,३९–४१, ४५,४६,५०, ५४,६१,७०, ७४,७८, १०३,११०,११९
–चाकर व नातलग ४२,४३,४९,५७, ६२, ६६, ६७,७५,७६, ८४, ९१, ९८, १००, १०१, १०४–१०६, १०९,१११, ११३–११५, १२२
होळकर–तुकोजी ९३
–मल्हारराव ७,५६,१०७, ११६,१२०
–यशवंतराव ९९

जेथें स्पष्ट निर्देश नाहीं त्यांचें वर्गीकरण अंदाजी आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत ऐतिहासिक विवेचन कां नाहीं याचा खुलासा पृ. ८ वर मीं केला आहे. त्यांत वर्णिलेले फार्सी–मराठी कागद अजून माझे हातीं आले नाहीत. शिवाय मोठी विवेचनात्मक प्रस्तावना लिहिण्याइतकी सवड मला

चवड कांहीं तास दाबाखालीं ठेवतों. यामुळें कागद दमट बनून उकलतां येतात व उकलण्याची क्रिया पुष्कळ वेळ चालली तरी ते वाळत नसल्यानें प्रयोग यशस्वी होतो. या पद्धतीनें मी पूर्वी पुष्कळ कागद व पोथ्यापानें विलग केलीं आहेत. या वेळींही कांहीं कागद या पद्धतीनेंच हातीं लागले. पण पुष्कळ पूर्णपणें एकजीव झाल्यामुळें सुटले नाहींत. अर्थात् तेवढ्या कागदांस इतिहासाभ्यासी अंतरले. या कागदांत जयपूर–मराठे संबंधावर प्रकाश पाडणारे बरेच कागद असावे असा माझा तर्क आहे. यामुळें हानी विशेषच झाली आहे. पण हळहळण्या-शिवाय गत्यंतर नाहीं.

यापुढील काम म्हणजे नकलण्याचें. हें मुख्यतः मलाच करावें लागलें. पण यावेळीं नकलण्याजोगे मराठी कागद संख्येनें फार नव्हते. यामुळें नकलांचें काम लवकरच आवरलें.

पुढील काम तारखा ठरविण्याचें. हें काम जितकें महत्त्वाचें तितकेंच जिकिरीचें आहे. याची थोडीशी कल्पना मी पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत दिली आहे. व्यक्तिशः माझी या कामांत पुष्कळ प्रगति झाली. शकावलीच्या स्वरूपाच्या पुष्कळ तारखा मीं एकत्र केल्या. पुष्कळ मृत्युतिथीही एकत्र जमविल्या. पण प्रकाशनाच्या घाईमुळें अभ्यासूंच्या उपयोगासाठीं त्या येथें देणें शक्य झालें नाहीं. नाहींतर त्या अभ्यासूंना मजप्रमाणेंच उपयोगी पडल्या असत्या.

याच दप्तराच्या पहिल्या खंडांत केवळ पूर्वपेशवाईंतील २१९ पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. पण अनवधान व अनभ्यास यामुळें त्या काळांतील कांहीं पत्रें त्या खंडांत घालावयाचीं राहिलीं. तीं, नव्यानें मिळालेलीं पण पूर्वपेशवाईंतील कांहीं, उत्तर पेशवाईंतील आणि ज्यामधील अर्धवट कालनिर्देशावरून तारखा निश्चित करतां येत नाहींत, अशीं सर्व पत्रें ( १२५ ) यां खंडांत समाविष्ट केलीं आहेत. बापूजी महादेवाचीं कांहीं पत्रें अशीं आहेत कीं, तीं या दोन खंडांत समाविष्ट व्हावयास पाहिजेत. पण अक्षर अतिशय दुर्बोध असल्यामुळें त्या पत्रांच्या नकला करण्यांत फार वेळ जातो. यामुळें बापूजी महादेवाचीं कांहीं पत्रें अजून तशींच राहिलीं आहेत. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत मी लिहिलें आहे कीं, या दुसऱ्या खंडांत २५०।३०० पत्रांचा समावेश होईल. पण कांहीं पत्रें वर सांगितल्याप्रमाणें अजून नकलावयाचीं आहेत. उलट हा खंड सुमारें १२५ पानांचाच काढाव-याचा ठरल्यामुळें अदमासें चाळीस पत्रांच्या नकला तयार असून तीं या खंडांत घालण्याजोगीं होतीं तरी बाजूस ठेविलीं. शिवाय मराठे-इंग्रज संपर्ककाळांतील मराठी व फार्सी पत्रें आहेत तीं वेगळींच. या सर्वांचा तिसऱ्या खंडांत समावेश होऊन तोही यथावकाश प्रकाशित होईल.

या खंडांत ज्यांच्या तारखा ठरवितां आल्या नाहींत अशीं २५ पत्रें छापिलीं असून त्यांविषयीं दोन शब्द लिहिणें आवश्यक आहे. कोणतेंही जुनें ऐतिहासिक पत्र घेतलें तरी त्यांतील निर्दिष्ट व कार्यकारी व्यक्तींपैकीं एक किंवा अधिक

व्यक्तीचे मृत्युदिन आपणांस ठाऊक असणें शक्य आहे. पण तेवढ्यानें प्रायः कांहींच होण्यासारखें नाहीं. उ. नजीबखानाची मृत्युतिथि १७७० आक्टोबर २८ किंवा ३१ होती येवढें समजल्यानें ज्या पत्रांत नजीबखानाच्या हालचाली वर्णिल्या आहेत त्या पत्रांचा काल कसा ठरणार ? त्यासाठीं त्या हालचाली केव्हां झाल्या तें इतर पुराव्याच्या साह्यानें ठरविलें पाहिजे. तो पुरावा मला माझ्या सवडीनें झालेल्या अभ्यासांत नीट आढळेना. म्हणून केवळ अंदाजी तारखा न देतां पत्रें तशींच छापणें मला प्रशस्त वाटलें. अभ्यासक स्वतःच्या कल्पनेप्रमाणें त्यांच्या तारखा बसवूं शकतील किंवा अधिक सवड सापडून मला बसवितां आल्या तर मीच बसवून पुरंदरे दप्तर पहिल्या खंडाच्या दुरुस्त तारखा प्रकाशित केल्या तशा प्रसिद्ध करीन.

या खंडांत आलेल्या पत्रांचें वर्गीकरण असें—

गोपाळराव गणेश २२
गोविंद तमाजी व धर्मराव तमाजी ५, ८,१८,२४–३०,३५
गंगाधर यशवंत चंद्रचूड ४४,११७
चिंतो कृष्ण ४४
जमाजी शिंदे ३१,३६
नाना फडणीस ९६,१२३
पेशवे–माधवराव बल्लाळ ४८,५८,६३, ७३,७७,८२,८३
– रघुनाथराव ३२,३३,४७,५१, ५२,५५,५९,६०,६४,६५,६८ ६९,१०२,१०८,११८ ?
– सवाई माधवराव ९०,९५
यशवंत बाबूराव ३७,३८
रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण ७१,८१
संकीर्ण ३,४,६,१६,८६,८९,९२,९४, ९७,१२१
सखारामबापू ३४
सवाई जयसिंघ १,२
हिंगणे–गोविंद पुरुषोत्तम ११२
–दामोदर महादेव ९,१२–१५
–देवराव महादेव ७२, ८५
–पुरुषोत्तम महादेव २०,५३, ७९,८०,८७,८८,१२४
–बापूजी महादेव १०, ११, १७,१९,२१,२३,३९–४१, ४५,४६,५०, ५४,६१,७०, ७४,७८, १०३,११०,११९
–चाकर व नातलग ४२,४३,४९,५७, ६२, ६६, ६७,७५,७६, ८४, ९१, ९८, १००, १०१, १०४–१०६, १०९,१११, ११३–११५, १२२
होळकर–तुकोजी ९३
–मल्हारराव ७,५६,१०७, ११६,१२०
–यशवंतराव ९९

जेथें स्पष्ट निर्देश नाहीं त्यांचें वर्गीकरण अंदाजी आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत ऐतिहासिक विवेचन कां नाहीं याचा खुलासा पृ. ८ वर मीं केला आहे. त्यांत वर्णिलेले फार्सी–मराठी कागद अजून माझे हातीं आले नाहींत. शिवाय मोठी विवेचनात्मक प्रस्तावना लिहिण्याइतकी सवड मला

[illegible] करावा लागला. यामुळें या
[illegible] नाहीं. पहिल्या खंडाप्रमा
[illegible] वरील कारणामुळें तशी
[illegible] ठरल्यास दोन्ही खंडांची
[illegible]

[illegible] प्रस्तावना नव्हती तरी महादेवभटाच्य
[illegible] चार शब्दांत नमूद करतों. पहिल्य
[illegible] हिंग्याचा आजा पद्माकरभट याच्या
[illegible] केलें आहे. पण प्रस्तुत खंडांतील
[illegible] आणि जानभटाचा निपणतू अर्थात
[illegible] जानभट येवढी माहिती आपणास
[illegible] असावेसें दिसतें. या दो
[illegible] संबंध कसा उत्पन्न झाल
[illegible] जयपूर, जोधपूर, बुंदी, कोटें, भरतपू
[illegible] राजपुरोहीत विविध राजकारणं
कामें करतांना दिसतात. हिंग्यांचा मूळ पुरुष जानभट हा थोरल्या जयसिंगाच्य
वेळेपासून जयपूरच्या राजघराण्याचा नाशिक–गोदावरीचा तीर्थपुरोहीत होता
त्याबद्दल त्यास थोरल्या जयसिंगाच्या हि. १०३५ शाबान ११ (इ. १६२
एप्रिल २८) च्या परवान्याप्रमाणें २५ रुपयांचें वर्षासनही मिळत होतें. जयसि
हि. १०२७ मध्यें जयपूरच्या गादीवर आल्यानें हि. १०३५ मध्यें त्यानें परवान
देणें अगदीं शक्य आहे. थोरला जयसिंग जहांगीरच्या कारकिर्दीत पर्वीजबरो
आणि शिवाजी विरुद्ध स्वतंत्रतेनें दक्षिणेंत आला होता तेव्हां महादेवभटाचे पूर्वज
जयसिंग यांचे संबंध अधिक दृढावले असावे. सवाई जयसिंगानें अनेक महाराष्ट्री
ब्राह्मणांस वर्षासनें देऊन आपल्या राज्यांत नेल्याचें आपणास माहीत आहे. तेव
महादेवभट किंवा त्याचे वडील हेही निदान मधून [illegible] तिकडे गेले असतील
सवाईच्या कारकिर्दीत त्याच्याच वजनानें मराठ्यांचा दिल्ली दरबारांत प्रवेश झाला
यामुळें महादेवभटाचेंही महत्त्व वाढलें. सवाईच्या वेळींच महादेवभटानें जयपू
संस्थानांतील शालिग्रामपुरा हें गांव इजाऱ्यानें किंवा इनाम म्हणून मिळविलें.
गेल्या उन्हाळ्यांत पेशवे दप्तरांतून २५ वर फार्सी पत्रें नकलून आणलीं अस
त्यांत महादेवभटाचे जे गौरवपर उल्लेख आहेत आणि महादेवभटाच्या कामगिरी
विषयीं मराठी व फार्सी कागदांतून जे निर्देश आले आहेत त्यांवरून तो मोठ
नेकीनें, हिंमतीनें व शहाणपणानें आपलीं कामें करी असें दिसतें. पेशव्यांनीं हा
अभिप्राय दामोदर महादेवास लिहिलेल्या एका पत्रांत 'तुमचे बाप शहाणे प्रामा
णिक योग्य होते' अशा शब्दांनीं व्यक्त केला आहे (हिंद १।११).

# निवेदन



प्रस्तुत हिंगणे दप्तराचा दुसरा खंड श्रीमंत बाबा
स्मारकग्रंथमालेंतील पहिलें पुष्प म्हणून काढण्यांत येत
इचलकरंजीकर यांची भा. इ. सं. मंडळावर बरीच कृप
मंडळाला अनेक प्रकारांनीं साहाय्य दिलें होतें. तेव्हां श्रीमं
नंतर इचलकरंजी येथें एक स्मारकसमिति स्थापन होऊन त्या समितीनें पारितोषिकें, शिष्यवृत्त्या, ग्रंथप्रकाशनें इ. योजना आखून त्याप्रमाणें कांहीं अंमलांतहि आणल्या. श्रीमंतांची पुण्यतिथि दरसाल भा. इ. सं. मंडळानें साजरी करावी अशी समितीनें इच्छा प्रदर्शित केल्यावरून मंडळानें तात्काळ तिला संमति दिली व तदनुसार मंडळ तें कार्य उत्साहानें पार पाडीत असतें. गुदस्तां कै. श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं समारंभ झाल्यावेळीं भा. इ. सं. मंडळाच्या चिटणिसांनीं समितीच्या चालकांना अशी सूचना केली कीं, श्रीमंत बाबासाहेबांना इतिहासाची फार आवड होती व नवीन अस्सल साधनें बाहेर यावींत याबद्दल त्यांना तळमळ वाटत असे. आज मंडळांत कितीतरी महत्त्वाचीं कागदपत्रें पडून आहेत व तीं सर्व प्रसिद्ध करण्याचें सामर्थ्य मंडळाला नाहीं. तेव्हां समितीनें खर्च दिल्यास मंडळ दरसाल एक साधनग्रंथ पुण्यतिथीच्या दिवशीं प्रसिद्ध करील व तो श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर स्मारकग्रंथ म्हणून समजावा. या योगानें श्रीमंतांचें चांगलें अक्षय्य वाङ्मयीन स्मारक होऊन ऐतिहासिक साधनांतहि नवी नवी भर पडत जाईल. ही सूचना तात्यासाहेब केळकर यांना फार पसंत पडली व त्यांनीं समितीच्या चालकांना ती स्वीकारण्याविषयीं लगेंच विनंतिहि केली. तिचा उपयोग होऊन प्रस्तुत खंड पुढें येत आहे. यावेळीं तात्यासाहेब केळकर आमच्या सुदेवानें हयात असते तर त्यांना केवढें समाधान वाटलें असतें! असो.

आतां या स्मारकग्रंथमालेंतून दरसाल एक याप्रमाणें महत्त्वाचे साधनग्रंथ प्रसिद्ध होत जातील अशी सोय झाली आहे. मंडळाच्या स्वीयग्रंथमालेंतून व त्रैमासिकांतून जीं साधनें प्रसिद्ध होतात, त्यांच्या भरीला प्रसिद्धीचा एक नवीन मार्ग निघाला याबद्दल मंडळाच्या सभासदांना आनंदच वाटेल. हा मार्ग पाडून दिल्याबद्दल मंडळ स्मारकसमितीचें ऋणी आहे. इतर स्मारकसमित्यांना तिनें हा मार्ग दाखवून दिला आहे व त्याचें अनुसरण झाल्यास कितीतरी अंधारांत पडलेलीं दप्तरें प्रकाशांत येतील व महाराष्ट्राला स्वच्छ प्रकाश देतील.

मंडळाचे संशोधक श्री. गणपतराव खरे यांनीं संपादिलेल्या या खंडांत जीं १२५ पत्रें आहेत तीं पहिल्या खंडांतील २१९ पत्रांना पूरकच म्हणतां येतील. हिंगणे दप्तरांतील पत्रांचें महत्त्व किती आहे हें पहिल्या खंडावर जे विद्वान इतिहासज्ञांनीं अभिप्राय व्यक्त केले आहेत त्यावरून कळेलच. हा खंड फार घाईनें काढावा लागला. त्यामुळें विवेचक प्रस्तावना, परिशिष्टें वगैरे देऊन चांगला सजवितां आला नाहीं. प्रथम स्मारकग्रंथ म्हणून कांहीं अस्सल फार्सी पत्रें भाषांतरासहित देण्याचें योजिलें होतें; पण फार्सी मुद्रणाची सोय येथें होऊं शकली नाहीं. तेव्हां श्रीमंतांच्या पुण्यतिथीचा दिवस साधण्यासाठीं प्रस्तुत खंडाची घाईनेंच तयारी करावी लागली. श्री. खरे यांनीं प्रस्तावनेंत आश्वासिल्याप्रमाणें पुढील खंडांत या उणीवा भरून निघतील अशी उमेद बाळगतों.

तीर्थोपाध्याय व त्यांच्या वह्या इतिहाससंशोधनाच्या कामीं किती उपयुक्त आहेत हें वारंवार मंडळाकडून पटवून देण्यांत येत असतेंच आपल्या वंशावळी व पूर्वजांचीं अस्सल हस्ताक्षरें तीर्थोपाध्याय आपल्यास जेव्हां दाखवितात तेव्हां किती आनंद वाटतो याचें प्रत्यंतर प्रस्तुत निवेदकाला नुकतेंच आलें. मागील आठव्या पिढींतील रघुनाथभट गणेशभट ( कर्वे ) यांचा शके १६४० श्रावण वद्य १३ या मितीचा लेख क्षेत्र त्र्यंबकेश्वरीं वे. मू. त्र्यंबकभट वामनभट फडके यांनीं जेव्हां काढून दाखविला व "ग्राम पंचनदी सुखवास माडले प्रांत राजपुरी" असें घराण्याचें मूळ ठिकाण माहीत करून दिलें तेव्हां केवढा ज्ञानानंद झाला ! हाच अनुभव पुष्कळांस आला आहे. तेव्हां अशा ऐतिहासिक पुरुषांचीं हस्ताक्षरें, वंशावळी, वास्तव्यस्थानें आणि कालनिर्देश दाखविणाऱ्या तीर्थोपाध्यायांजवळच्या वह्या यापुढें सुरक्षित राहण्याची योग्य तजवीज करणें संशोधकसंस्थांना व सरकारलाहि आवश्यक झालें आहे, असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. या वह्या आतां फार जीर्ण झाल्या असून वांटण्यांमध्यें व्यवस्थित राहात नाहींत. त्र्यंबकेश्वरीं गटारांतून अशा वह्यांच्या पानांचे तुकडे पाहिले तेव्हां वाईट वाटलें. असो. मायक्रोफिल्मच्या साहाय्यानें कांहीं पानें तरी चिरंजीव करणें प्राप्त आहे. हिस्टॉरिकल रेकार्डस कमिशननें याचा त्वरित विचार करणें कर्तव्य आहे.

येथें याप्रमाणें तीर्थोपाध्यायांचा उल्लेख करण्याचें कारण महादेवभट हिंगणे व त्याचे पूर्वज तीर्थोपाध्याय असल्यानें त्यांचा निकट संबंध रजपूत राजांशीं फार पूर्वी आला. जानभट हिंगणे हा मिर्झा राजा जयसिंग याचा नाशिक–गोदावरीचा तीर्थोपाध्याय असून त्याला सालीना २५ रुपये वर्षासन मिळत होतें अशी माहिती या संग्रहांतील १–२ या पत्रांवरून मिळते. म्हणजे शिवाजी महाराजांच्याहि पूर्वी मिर्झा राजांशीं महाराष्ट्र–तीर्थोपाध्यायांचा संबंध येऊन त्याची परिणति हे तीर्थोपाध्याय जयपूरच्या दरबारीं वकील होण्यांत झाली, हें नव्यानेंच वाचून तीर्थोपाध्यायांबद्दल आज अजीगात नष्ट झालेली आदराची भावना पुन्हां रुजेल असें

वाटतें. पुरोहितांचे प्रधान झालेले आहेत. तेव्हां हिंगण्यांसारख्या तीर्थोपाध्यायांचे दूरवर पोंचणारे हात स्वराज्याची घडी बसविण्याच्या कामीं उपयोगी पडतात, असें इतिहासज्ञांनीं आतां ओळखलें पाहिजे व तीर्थोपाध्यायांकडील वंशनामावली लक्ष्यांत घेतल्या पाहिजेत.

या संग्रहांत कांहीं डिंगल भाषेंतील पत्रें आहेत त्यांचा भाषाभ्यासकांना कांहीं उपयोग होईल. मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश पाडणारीं इतर भरतीय भाषांतील साधनें त्यांनीं जमवून पुढें केलीं पाहिजेत. आज हिंदी–हिंदुस्थानीचा अभ्यास महाराष्ट्रांत होत आहे. त्याचें फळ या रीतीनें तरी पदरांत पडावें.

इतिहासज्ञांनीं पहिल्या खंडाप्रमाणेंच याहि खंडाचा परामर्ष घेऊन संपादकाला व मंडळाला अशा प्रकाशनाच्या कामीं उत्तेजन द्यावें, अशी विनंती करून हें निवेदन संपवितों.

मार्गशीर्ष शुद्ध ११
शक १८६९

चिंतामण गणेश कर्वे
चिटणीस, भा. इ. सं. मंडळ

# शोध

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ३१ | कृपामान | कृपाराम |
| ६ | २३ | हिंद २।३१ | हिंद १।३१ |
| ७ | २ | येऊ | येऊ... |
| ७ | ११ | जानेवारी १७५१ | १७५१ जानेवारी |
| ८ | ११ | रखर १२ | रखर १७ |
| ११ | ११ | माधोसिंग | माधोसिंगास |
| १३ | ८ | मढावे | पडावे |
| १५ | ३४ | भाऊन | भाऊस |
| ५० | १४ | श्री | श्रीकृष्ण |
| ५६ | १८ | रखर ३० गाळावें | |
| ७६ | ४ | सफर ७ | सफर ८ |
| ८६ | १३ | शुद्ध ९ | शुद्ध ९ सोमवार |

# संक्षेप, खुलासे

इ. = इसवी सन
नि. = निराळें हस्ताक्षर
फा. = फार्सी
ब. = बदामी आकारचा
मो. = मोर्तब
मो. जा. = मोकळी जागा
ले. = लेखांक
ल. = लंब वर्तुळी
वा. = वाटोळा
श. = शक
शि. = शिक्का
ष. = षट्कोनी
सं. = संवत्
सु. = सुहूर सन, सुमारें
हिंद=हिंगणे दफ्तर खंड

पत्राच्या मूळ पाठांत अधिक असलेलीं अक्षरें, शब्द, मजकूर गाळावा हें दर्शविण्यासाठीं ( ) हा कंस वापरला आहे.

पैवस्तीचा शेरा पत्राच्या गर्भांत कधींच नसतो. पण काटकसरीसाठीं कांहीं ठिकाणीं तो पत्राच्या शेवटच्या ओळींत बसविला आहे.

सूचीमध्यें ज्यांपुढें २९ हा आकडा असेल ते शब्द पृ. २८ वरील ले. ३० मध्येंही पहावे आणि ज्यांपुढें ३० हा आकडा आहे ते पृ. ३० वरील ले. ३० मध्यें पहावे. घाईमुळें दोन लेखांवर ३० हा एकच आकडा पडला आहे.

सूचीमध्यें सानुस्वार शब्द तत्सम निरनुस्वार शब्दांखालींच घातले आहेत. जसें कपठाण खालींच कंपनी.

| | | |
|---|---|---|
| के. १ सं. १७९२<br>आषाढ वद्य ३० | श्रीरामजी | श. १६५७ ज्येष्ठ वद्य ३०<br>इ. १७३५ जुन ५ |

सही जेस्यंघजी

[ वा. फा. शि.* ] श्रीमहाराजाधिराज सवाई जयसिंघ इन्न महाराजा विसनसिंघ ११३५ सनह ५

सिधिश्री महाराजाधिराज महाराजा श्रीसवाई जेस्यंगजी देववचनात अपरं चि आगै तीरथप्रोहत नासिक गोदावरीका मवाफिक प्रवांनै महाराजा वैकुंटवासीजी श्री [ मो. जा.* ] जी करार ता. ११ सावांन सन १०३५ नांय जांनभट मांडुगनकै व पदमनाथ व विनायक वेटा महादेवभटका बाम्हणकै मुकरर छी सो जांनभटका भाई चिंतमणिकै जवाई वेटा नारांयण काळुणकर आगै हजुरि आय अरज पौंहचाई जो जांनभट वगैरहकै ओलादि नही सो विरति सारा मौनै मुकरर करी छै तीपरि प्रवांनु अमल हाल करार ता. १६ र. सांनी सन ११११ को नांय अनंत वेटा नारायण काळुणकरकै हुवो छो सो प्रवांनुं महादेव गोव्यंदभट हीगणाका वा लछिमण वावदेवका अनंतका पोता ले हजूरि आय अरज पौंहचाई जो अनंत वा गोव्यंद वा वावदेव तौ मुवा प्रवांनु म्हारे नांय कराय दीजैई वासैते तीरथप्रोहतांई नासिक गोदावरीकी महादेव गोव्यंदका वा लछिमण वावदेवका वगैरह ओलादि अनंतकांनै मुकरर फुरमाई छै अर जांन-भट वगैरहकी ओलादि कोई होय अर प्रोहतांईको प्रवांनु वांकै होय तो तीरथ प्रौहत वैसक छै ईंकी प्रौहतांई नांमनजूर मिती आषाढ वदिऽऽ (३०) संवत् १७९२

[ पाठीवर* ]

[ वा. फा. शि* ]...

| | | |
|---|---|---|
| फिद्वी मुहम्मदशहा<br>बादशाह गाझी | नकल लिपी<br>[ असे तीन शेरे* ] | वाषाले नरायणदास<br>वाकीनघारा दीवान |

---

| | | |
|---|---|---|
| के. २ सं. १७९३<br>सं.[2] १७९४ ज्येष्ठ वद्य ११ | श्रीरांमजी<br>बडा जेस्यंघजी | श. १६५९ वैशाख वद्य ११<br>इ. १७३७ मे १४ |

[ ले. १ प्रो शि.* ]

श्रीरांम सही

सिधिश्री महाराजाधिराज महाराजा श्रीसवाई जेस्यंघजी देववचनात कमैती प्रगनां आंवेरिका दिस्ये सुप्रसाद वंच्या अप्रे चि वावति पुन्यवरषासण षाळीनां रुपया २५ ) वे महादेव गोव्यंदका पदमाकरका पोता बांम्हण महाराष्ट तीरथप्रोहित

---

१ हा काल संवत् चैत्रादि व महिने पूर्णिमांत धरून काढला आहे.

२ येथील संवताच्या जोड उल्लेखावरून हा चैत्रादि धरला पाहिजे असें दिसतें.

नासक गोदावरीजीकानै जो आगैं पुन्यवरषासण नांई जांनभटकै सालिनां वेकसूर वेनुकसान रुपया ५० ) मुवाफिक प्रवांनै महाराजा वैकुटवासीजी श्री [ मो. जा. * ] जीका करार ता. ७ जुमादलिसांनी सं. १०५५ संवत १७०३ का सौंपावै छो सो काळवसि हुवो अब वास्तै महादेवकै अरज पहोची तीसौं फुरमांत्रां छा मतलव प्रवांनांका सौं वाकिफ होय वरषासणका सालीनां रुपया पचीस वेकसूर वेनुकसान नाय महादेवकै इसतक भादवा सुदि ३ संवत १७९४ सौं वहाळ जाणि तैहवीळ पोतदार प्रगनां आंवेरिकासौं देवो. कीज्यो अर प्रतवरष नवौ प्रवांनो मति मांग्य ज्यो ईहीं प्रवांनासौं हिसावमै मुजरा होयळा साळीना रुपया २५) [ मो. जा. * ]

मुकररा तनषाह वरषासण इसतक मिती भादवा सुदि ३ संवत् १७९४ सौं वहाळ जाणि तैहवीळ पोतदार प्रगनां आंवेरिकासौ देवो कीज्यो साळीनां वेकसूर वेनुकसांनां रुपया पचीस २५)

[ पाठीवर* ]

सरह यादिदासति दाषिळ वाकै करार मिती जेठ वदि ९ संवत १७९४ साळ संवत १७९३ वरिसाळै नरांयणदास किरपाराम दिवान व निहाळचंद वाकानवीस अत्र डोळ पुन्यवरषासण वे महादेव गोव्यंदका पदमाकरका पोता परसोतमका पडपोता जांनभटका सडपोता वाम्हण महाराष्ट्र तीरथप्रोहित नासक-गोदावरीजीका जो आगै पुन्यवरषासण नांई जांनभटकैं साळीनां वेकसूर वेनुकसान रुपया ५० ) मुवाफिक प्रवानै वैकुंटवासीजी श्री [ मो. जा.* ] जी करार ता. ७ जुमादलिसांनी सं. १०५५ संवत १७०३ का सौंपावै छो सो काळवसि हुवो अब वास्तै महादेवकै अरज पहोची हुकम हुवा वरषासण साळीना रुपया पचीस इवतदाय मिती भादवा सुदि ३ संवत १७९४ सौंकरि प्रगनां आंवेरिपरि तनषाह करि प्रोहसो चाहिज्ये दिवांन–सरकारका प्रवांनां ळिषैं मितीं जेठ वदि ९ संवत १७९४ साळ संवत १७९३ अरज मुकरर पहोची मुकररा साळीनां वेकसूर वेनुकसान रुपया पचीस २५)

मुहाफिक यादिदासतिमै दसषत राजां आयामळ दिवांनयां

मिति जेठ वदि ११ संवत १७९४ साळ संवत १७९३ मुकाम सराय पोजाकी

| [ वा. फा. शि.* ] | [ वा. फा. शि.* ] | [ वा. फा. शि.* ] |
|---|---|---|
| श्रीनरायनदास । फिद्वी महाराजाधिराज । सवाई जयसिन्घ [ व पुढील शेरा* ] रजु दफत्र नराणइदास दीवान ...दफत्रसाह...मेआ लिषौ लिषौ [असे तीन शेरे*] | किरपाराम [सनाघ] बन्दह महाराजाधिराज सवाई जयसिन्घ [व पुढील शेरा*] रजु दफत्र क्रपामान दीवान | विजेराम [सनाघ] बन्दह महाराजाधिराज सवाई जयसिन्घ [ व पुढील शेरा* ] रजु दफत्र विजेराम मुस्तोफी हजुरि ॥ ८ ॥ |

ले. ३ वैशाख वद्य ५ सोम. || श्री || श. १६६२ वैशाख वद्य ५ इ. १७४० मे ५

श्रियासह सहश्रायु चि: विजयीभव मारकंडेचे आयुस्य परमपूज्य राजेश्री भाऊ साहिबजी याप्रति

सदा शुभचिंतक भोलानाथ नागोजी कृतानेक आसीरवाद उपरि येथे वैसाष वदि ५ चंद्रवार मुकाम मौखरी सुखरूप असो आपुला सुखसमाचार सदैव लिहीत गेले पाहिजे विशेष आपण गेल्यावर येथील कामकाज चि: राजेश्री रावजीचे सांगितल्याप्रमाने करीत राहिलो मग झासीहून धौकलसिंघ आल्यावर येथील कामकाज घरौटेचे...हीया लाला परमसुष वा पचमसिंघ वा धौकलसिंघ अन भगवान महते वा सदू दुबे पाची पंचाईत गाऊगंगा घरौट करून मग रावजीचे समक्ष जमाबंदी करून तहसील केली येथून तपसीलवार कागद सर्व रावजीने वा धौकलसिंघाने पाठविलेच असेल त्याने सर्व समाचार अवगत जालाच असेळ आपुले पुढे रबी येथील सकीमी होतीच इतक्यावर गारे पडले त्यामुळे जलालपूर वगैरह दौलतपूर जैपुरा दोन तीन गांवात अधिक नुकसान जाला दैवी इछेस उपाय नाही त्याची पत्र सेवेसि याही पठविलीच असतिल त्यावरून सर्व ध्यानास आले असेळ मग मी येथून चि: राजेश्री तात्याचे लग्नास श्री ब्रह्मावर्तास गेलो जेष्ट सुध ११ तेथे पावलो लग्न करून आखड वदि ५ स स्वार जालो ते कनोजेस चि: राजेश्री आबाजीबरोबर हवेली...ल आलो तेथे मी कार्तिक सुध...राहिलो हवेलीचा बदोबस्त करी [त]...मग रावजीने पत्र लिहिले की येथील... घरौटेचे बंद आहे तुम्ही हवेलीत दोन मानसे ठेऊन लवकर येने मग मी तेथून स्वार जालो ते मार्गेश्वर वदि २ कालपीवरून मौखरीस आलो येथील घरौटेचे कामकाज षरीफेचे अम्ही सर्व मिळून गावगंना सर्व केला मग रावजीचे समक्ष जमाबंदी केली तहसील करीत राहिलो माग चि: राजेश्री आबाने पत्र लिहिले की तुम्ही दतियास जाऊन कुटंबासगट तेथून यावे ते कनौजेस जाऊन हवेलीत राहने पौन शत रुपये षरचास पाठविले अन लिहिले की जे काही साहुकाराची बाकी राहील त्याची वाट करून लवकर ऐने मग अम्ही येथून पौष सुध १४ स्वार जालो ते माघ वदि २ दतियास घरी पावलो तेथील निर्गम करून साहुकारची वाट करून अवादे ळि···दिधले मग दतियाहून स्वार जालो ते फाल्गुन वदि ४ स राजेश्री मुस्तोफियाचे नातूचे लग्न राजेश्री गनपतिरावचे घरी होते ते वराते बरोबर अम्ही सह कुटंब सर्वांस घेऊन झासीस पावलो तेथे लग्न करून सर्वांसी निरोप घेऊन फाल्गुन वदि ९ स झासीहून स्वार जालो आपण देसाहून कापड दहा सनगे राजेश्री नरसिंघराव बापूचे घरी होती ते राजेश्री रावजीने मला लिहिले की तुमी मुनियाबाई समागमे दोन्ही गाड्या बरोबर घेऊन अपण देसाहून कापड आले आहे ते समागमे घेऊन ऐने त्यास मी बापूचे घरी जाऊन ते वस्त्र दहा

सनगी लहान मोटी होतीत ते समागमे घेऊन तेथून स्वार जाले ते भाडेरीचे वाटेमधे दोन कोस भाडेर राहिली होती अन चार घटक दिवस राहिला होता त्य समई दैवी कोप जाला···डे परिजंन्याची व्रष्टि जाली गारे प...

---

ले. ४
सं. १७९८ ज्येष्ठ वद्य ७ || श्रीरामजी || श. १६६३ वैशाख वद्य ७
इ. १७४१ मे २६

|| सिधिश्री सरववोपमां जोग्य पूज्यश्री भटजी श्री म्हादेवजी जोग्य लिषतं नरस्यंघदासके न्य पा ळागण वंच्या अठाका स्मांचार भळा छै राज्यका सदा भळा चाहिजे अप्रं च गोव्यंदरायजी माफिक मरजी आपके रातदिन वापूजी कने हाजिर रहै छै अर जो स्मांचार होवे छै सो वाने कहै छै अर आपने लिषे छै श्रीजी वापूजीसो राजी छै आप तो वडे वुधिवाण छो पण ये कांई मणभैं आई अवारतांई वाळाजीराव कनेन पोंच्या जो करी सो भळी करी होसी श्रीजीको सारी वातचीतको ठेराव पूज्य श्री राजासाहिव परिछै अर फतेरांमने तो हजूर सो या ही आग्रा करी छै जूं मुळजीसो सारा स्मांचार ळहिज्यो जो वे भळी जाणे ळो सोकरावा श्रीजीने तो···नरायणदास···कौ भेज···ठेरायो छो पण राव क्रिपारांमका कहा सों वावूरावजी अरज कर फतेरांमने ळा रळे ग्रा राज्य अर राजाजी दोन्यौ वडे वुधिवाण हो जो क्यौं करोला सो विचार कीजो अर एक अरजी सेवकने आपके पत्रमै भेजी छै सो पोचाय जुवाव भेज्यावौळा अर वाकी हकीकती गोव्यंदरावजीका ळिखा सो माळूम होसी मिति जेठ वदि ७ संवत १७९८

---

ले. ५
शव्वाल २० श्रीगजानन श. १६६४ मार्गशीर्ष वद्य ७
१४ जिल्काद इ. १७४२ डिसेंबर ७

श्रीमंत राजश्री वापूस्वामी चे सेवसी

पा गोविंदराऊ कृतानेक सां नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत छ २० माहे शौवाल मुा जयेपूर स्वामीचे कृपावलोकने येथास्थित असे विशेष येथील प्रसंग सकलही छ १७ चे माहे मजकुरी अजूरदार जोडीसमागमे श्रीमंत भाऊसाहेबी लेखन केलें असे पाऊन अवगत होणार प्रस्तुत श्रीमंत भाऊसाहेबी येथून छ १८ रोजी दिलीस प्रयाण केलें मुा चांदवाहून पत्रें पाठविलीं ते सेवेसी प्रेष्टिलीं असेत सर्व अवगत होईल आता दिलीसही लवकरीच पाऊन सार्व भौमाचे दर्षण संपादून पत्रही पाठवितीलच परंतु या दिवसांत वजिराने व असद यारखानानी राजश्री सवाईजीस बहूत शब्द लाऊन लिहिलें आहे कीं [मो. जा. *] पंतप्रधान याही बहूत विलंब लाविला वरकड कितेकांही इच्छा केली त्यांसी

कूफ करून पंतप्रधानांचाच इतबार दाखऊन यांजवरच प्रसंग ठहराविला
ासी अतांही भास्करपंतासी तेथील सुबेदागने शिकस्त दिघली मनसूर अली-
ानही पटण्यासी पावला या समयांतही जर त्वरेने आडवे होऊन त्यासी सिक्षा
देतात तरी यांत त्यांचा इतबार वाढतो व अम्हातुम्हासीही सुरखरूई प्राप्त
होते त्यासी स्वामीही श्रीमंतांचे सेवेंत हा प्रसंग निवेदन करून ऐसें करावें की
श्रीमंत भाऊ दिलीस पावलियानंतर तरी दरकूच त्याजवरी चालिले म्हणून
प्रथ्वीपतीस कललिया उत्तम असे व इतकेही श्रम केलियाचे सार्थक होऊन पूर्ण
इतबार श्रीमतांचा हजूर वाढतो त्यासी जेणेकरून त्वरेने तिकडे पावेत ते गोष्टी
करावी स्वामी सर्वज्ञाण आहेत विशेष काय लिहिणे हे विनंती

पो खडो जगदेराऊ सां नमस्कार विनंती लिखितार्थ परिसिजे रो
भाऊची व आमची भेटी कोटियात जाली समागमे जयेपूरपर्यंत आलो महाराजाची
कृपारामाची भेटी केल्या येथील कामकाज आमचे विशई रो गोविंदरावजीस
सागून गेले आहेत हे थोर महस्त आहेत आमचा समाचार फारसा घेतात
आपणास श्रुत होये कृपालोभ असो दीजे हे विनती

---

| | | |
|---|---|---|
| ले. ६<br>पौ शव्वाल १४ | श्री<br>पो छ १४ सवाल | श. १६६२–६४<br>इ. १७४०–४२ |

पुर्वणी श्रीमंत राजश्री बापाजी स्वामीस

विनंती उपरी नादरशाहाने नवाब जिकरियाखानासी फर्मान व खिलअत
खास पाठविला होता व कितेक फर्मायेशीही लिहिली होती त्याची नकल
जिकरयाखानाने सवाईजीस आपले पत्रानरूप पाठविली पापड व सेव व
अननास व अंब व चिंच व आंवला व गैरेयाचा मुरबा उतम व शाल बाबाही
जरूर पाहिजे खरीद करून लवकरी पाठविजे व पैका जो कांहीं लागेल तो
सरकारचे इजारियाचे तालुकियांत वजा करून घेणे व दोघे येलची जे पूर्वी
भाई महमदशाहासमीप अहवृधीकारणे पाठविलें होते त्यांही नादशाहसीं बहूत
सख्त रदबदली करून शुजाउदौलाचा अमवाल इछून कांहीं द्रव्य घेतलें व
बहूत तगादा केला त्याहीं हे कर्म विनाआज्ञेकरून भाऊसी बराबरी करून
इतकी बेअदबी केली व आपल्याकडें त्याही न पाहिले हे केवल त्याही अनुचित
कर्म केलें याजकरितां येकासी तरी जीवें मारिलें व दुसऱ्यासी कैदेंत करून कुल
मालमालियेत त्यांची जप्त केली त्यासी तुम्ही दिलीहून तहकीक वर्तमान हे जे
कांहीं पावले आहेत ते सकलही लिहून आणून पाठविजे म्हणून लिहिलें असे व
आतां खुद आपण रूमियांचे सरहंदेत अरूस म्हणून येक प्रांत आहे त्या ठिकाणी
अहे रूमवाल्यानी मागती स्पर्धा विचारिली व गिलजियांही बदकौली करून

पैकाटका न दिवला उभयेतांही फौजबंदी करून बह(स)ले आहेत यास्तव त्याचे तबीहेस प्रवर्तणार व तहमासासी मातबर फौजेनिशीं ठठाभकर या प्रांतीं बिदा केलें त्यासी आज्ञांही केली कीं महामदशाह ज्याप्रकारें आज्ञा करतील त्याप्रकारें सेवेंत जाऊन हजर होणें मागून आपणही येणार ऐसें वर्तमान लाहोरेहून लिहिलें आलें असे बहुधा राजामलजीसमोर तरी विस्तारपूर्वक नकला पावल्या असतील त्यावरून सर्व अवगत होणार नादरशाहाची पत्रें व फर्मायेश जे काहीं जिकरियाखानासी आली सर्वांची नकल संपादून पाठविली असे त्या वरून सर्व अवगत हे विनंती

---

ले. ७ रबब १५ } श्री { श. १६७० आषाढ वद्य २ इ. १७४८ जुलै १

राजश्री बापूजी माहादेव व राजश्री दामोदर माहादेव गोसावी यासि

दं अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य [ मो. जा. * ] श्रो मलारजी होळकर दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष राजश्री रावराबा उमेदसिंग याजविसी तुम्ही वचेनप्रमाण करून त्याच्या कार्यास तत्पर राहून करावे यैसे जातेसमई बोलोन गेलाच अहां त्यासि सांप्रत सार्वभौमाचा नूतन कारभार आहे कितेक जुनेनवें होणार या संधीमधे याचा अगत्येवाद करून तुम्हास आहेच त्याप्रमाणें दरबारचा रंग पाहून जेणे करून जडाव होयें ते करावें येविसी अम्हास अगत्येवाद ते तुम्ही जाणतच आहां पक्ष धरळा तो सिधीस न्यावा यैसे अहे तरी जेणेकरून रावराजा याचे कार्ये होयें ते करणें याजकडील दिलाराम वकील तेथे अहे तो तुम्हास जाले वर्तमान सागत जाईळ त्याप्रमाणें कार्येभाग त्याचा करीत जाणें [ नि. * ] बहूत काये लिहिणे रा छ १५ रजबू हे विनंती [ वा. * ] मोर्तब सुद

[ पाठीवर डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत हिंद २।३१ प्रो शि. * ]

---

ले. ८ पो मोहरम १२ } ३ पो छ १२ मोहरम { श. १६७१ मार्गशीर्ष शुद्ध १५ इ. १७४९ डिसेंबर १२

गोविदजी व ठाकूर…सिंगजी हे उभयेता तमाम लाहन थोर रजपुतां सहीत व सेरवावतांसहवर्तमान बिदा जाहले त्यासी अजी आठदाहा दिवस जाहले कीं सात आठ हजार फौज व तोफखाना यांनी जमा करून दोनी तिनी हजार फौज भल घोडीस्वार व करावल सिध करून त्यांचे शोधेस्तव पुढें येक मजल धाविले तुरकांजवल दोनी हजार स्वार व दोनी तीनी हजार प्यादा गांवगुंड

येकवट जाइले होते जसी यांची आमदनी त्याहीं पाहिली त्यांजकडून तग न धरवला गेला सेवटीं जसी फौज समीप येऊ यानंतर बख्तसिंगजीस पंचेवीस हजार फौजेनिसी अणून हाजर करितों तेव्हां त्यासी सरफाराज करून अगऱ्याचा सुबा व अजमेरचा जिला कुली त्यासी देऊन सरफराज करावें हा हेत बादशाहतेचा याजवरून श्रीमंत बापू यानी प्रायेशः अर्ज केला कीं राजा रामसिंगजी विरसेदार त्याची दस्तगीरी करून सरफराज करणे विहीत जरी हेही न होतां रामसिंगजीसीं उदासीनता करून बख्तसिंगजीस टिका देऊं म्हणाल तर सरदार परम विशम मानतील सेवट ते तोंडा मारून रवी पाडिल्यानंतर...... भाल्यासी जे मर्त...............

---

ले. १ } २ { श. १६७२ पौष माघ<br>इ. जानेवारी १७५१ आरंभ

म्हण व लोक बऱ्हाणपुरीहून नासकास येणार अहेत त्यास रवाणा करून आम्हीं औरंगाबादेकडे कूच करूं ईश्वरइछेने उमेद तों हे आहे कीं जोवर हैदराबादकर औरंगाबादेस पावले नाहींत तोंवर आम्हींच जाऊन पोंहचूसें दिसतें याहीवर ईश्वरइछा औरंगाबादची कुल मंडळी वरचेवर अर्जा लिहितात ईश्वर इछेने पावतांच बऱ्हाणपूरकरांसारखे येऊन मुलाजमत करतील जर यांज आगोधर हैदराबादकर येऊन पावला तर मग विचारेंच जे होणे तें होईल परंतु दिसतां हेच दिसतें की हेच आगोधर जातील त्याजपासिं तोपखाना व फौज मोठी म्हणून लिहिले तर त्याची बातमी नित्य येतच आहे बहुधा सैदलष्करखांही पाये काढून आले व मऱ्हाटे वगैरे तिकडेही लिहितात व इकडेही लिहितात दोन्हीही साहेबजादे त्यांस येकाकडे होऊन निकराने येकासीं जुंजवत नाहीं येक त्याबला गारदी फिरंग्याचा भरवसा खराखुरा आहे त्यांत गारद्याचा सरदार मुजफरजंग त्याची नविस्तखांद गाजुदीखानाकडे आहे तोही मुग्धेतच आहे राहिले फिरंगी तर त्यांच्या येकल्याच्याने काय होतें याही वर जे जें ईश्वरास करणे तें तें होईल तुम्हीं निश्चिंत घरीं राहाणे कोणे गोष्टीचा संशये न करणे गत वर्षीचा विचार आणीखच होता यंदाचा आणीखच आहे नासकापर्यंत ईश्वरकृपेनें यंदा नौबत येणार नाहीं खुशाल राहाणे काडी इतकी चिंता न करणे शालांचे गठे भाईभटीं आणिले ते बांधून ठेविले म्हणून लिहिलें तर उतम केले श्रीमंतापासिं नेऊन द्याल म्हणून लिहितों परंतु श्रीमंत बाहेर निघाले आतां कोणीकडे घेऊन फिराल अतःपर श्रीमंताची आमची भेटी जालियावर जेणे प्रमाणें ते आज्ञा करतील तेणे प्रमाणें केले जाईल वरकड वर्तमान यथास्थित आहे तुमचे खास दस्तूर पत्र पावलें समाधान जालें वैसेच निरंतर लेहत जाणे [ नि.* ] अक्षर वळवणे

विद्याभ्यास करीत जाणें सदैव तिकडील वर्तमान लिहीत जाणे बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

राजश्री यादोपंत यासी नमस्कार वो भाईभटजीस नमस्कार

पाा भाद्रपद सुध ४

सो विनंती सेवक त्र्यंबक मलारी कृतानेक सा नमस्कार विनंती लिखितार्थ परिसून कृपा केली पाहिजे चिरंजीव आनंदरावजीस पत्र लिहिलें आहे कृपाकरून पावतें केले पाहिजे बहूत काय लिहिणे कृपा केली पो हे विनंती वो राजश्री भाईस नमस्कार लोभ असों दीजे हे वि[नंती] राजश्री यादोपंत स्वामिचे सो सो नमस्कार विनंती लिखितार्थ परिसून लोभ असों दीजे हे विा

---

| | | |
|---|---|---|
| ले. १० | श्री | श. १६७२ फाल्गुन वद्य ४ |
| रखर १२ | पो छ १९ राा खर | इ. १७५१ मार्च ५ |

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा व नाना यांप्रती बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ १७ माहे राखर मुाा इंद्रप्रस्थ जाणून स्वकुशल लिहिणें विशेष तुमची पत्रें जवाबी कासिदासमागमें छ ८ तारखेचे । दाहावीचें व अकरावी तारखेचें यैसी पै दर पै येऊन पावली सविस्तर वर्तमान कळों आले राा सुभेदार सत्वरच आगरियास येऊन पावतात वजीर आजम तिकडून येतात भेटीचा रंग कसा घडतो पटाणाचा मनोदय तोही कलेल प्रसंगानरूप जे घडोन येईल तसतसा रंग पाडावा लागेल म्हणून तपसिलें लिहिलें त्यासी वजीर आजम तुमच्याच विचारें गोष्टमात जे करावयाची ते करतील सुभेदार व पठाण दुसरे तिसरे तुमच्या विचाराखेरीज अन्य गोष्ट करतील यैसे नाही सुरजमल बहुधा मथुरेयास वजीरजीस भेटून मग सुभेदारांस भेटतील [अै]सा विचार दिसतो त्याहीवर न कले यैसी गोष्ट होऊन आलियां प्रस्तुत तो सुभेदार वजीर आजमच्या...दास्त किमपि बोलणार नाहींत पठाणाचा ...साला जालियानंतर जाटासी कलह करतीलसें मा[नस दिसते] तथापि सरदार आहेत जे करतील ते विचारूनच करतील तुम्ही तेथील वर्तमान वरचेवर लिहित जाणें दक्षणचें वर्तमान तर हिदायत मोहिदीखान व पठाण वगैरे हैदराबाद प्रांताकडे यावयाचे मानस करून मजल दर मजल चालले येत होते त्यास पठाण शरारतीवर प्रवर्तून हिदायत मोहिदीखानाचे बुनगे.......... पछाडीची लुटली त्यावरून हिदायत मोहिदीखानानी मनाईस्तव चार भले माणूस पाठविले त्याणी त्यास बेअब्रू करून युध्यास मुस्तेद जाले हेही तयार होऊन लडाईस सिध जाले पठाण यांजवर चाळून आलियावर उभयतांत येक घटकापर्यंत तरवार गोळी चालली हिमत बाहादूर व हिदायत मोहिदीखान व

आणीख दोन च्यार सरदार यैसे मातबर कामास आलें द्वाही निजाम अलीखान नासरजगाचे धाकटे बंधू यांची लश्करांत फिरली तमाम मऱ्हाटे [ सरदार ] मजल दरमजल हैदराबादेकडे चालते येतात हे [ वर्त ] मान तथ्य साहुकारियांत येऊन सार्वभौमास अर्ज जाला त्यास दक्षणचा मुदई सहजांत मारला गेला येश मुफ्तांत श्रीमंत स्वामीस आलें निजामनमुळुकाचे ताले सिकंदर श्रीमंत स्वामी पन्नह [ रती ] बसल्या ठाई यांचा अमल दक्षणेंत झाला फर्मान बऱ्हाणपुरास पावलियावर तेथें द्वाही यांची फिरली हेही वर्तमान येऊन पावलें तुम्हास कळावें म्हणून लिहिले असे देसीहून चिरंजीव तात्याचीं पत्रें व श्रीमंताची पत्रें आलीं तें बजिनस पाठविली असेंत त्याजवरून सविस्तर कळेल [ नि. ॐ ] बहूत काय लिा हे असीर्वाद

रा त्र्यंबकपंत व वेणाजीपंत व भाईभट बालकृष्णजीस सां। नमस्कार

सों गिरमाजी मकुंदे कृतानेक सां। नम[ स्कार ] विनंती मेवा व तांदूल व जोगीदोश पाठविले आहे सेवेसी पावतील हे विनंती.

---

ले. ११ } श्री { श. १६७३ वैशाख शुद्ध ४
जखर २ } { इ. १७५१ एप्रिल १८

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा व नाना यांप्रति बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २ माहे जाखर मुाा इंद्रप्रस्थ जाणून स्वक्षेम लिहिणें विशेष तुमचें पत्र छ २१ माहे जावलचे आलें त्याजउपरी किमपि वर्तमान कळो येत नाही याजकरितां चित्त सचिंत आहे तर आपलें कुशलोत्तर वर्तमान वरचेवर लिहीत जाणें यानंतर वजीर आजमचे वर्तमान [दरबारी आहेत] त्याजवरून कळतें खंडेरायाही रुस्तु[मीचे] काम केलें म्हणून वजीर आजमनी बहुतसी तारीफ लिहिली होती व फतेआली वगैरे यांही बरा तरतूद केला सुभेदारही स्वार होऊन उभे राहिले होते वजीर आजम यानी स्वारी तयार करून उभे राहिले होते सुभेदारांची बहुतच स्तूत लिहिली होती पठाणाही यांस गाफील पाहून मोर्च्यावर आले होते त्यांस मारून काढिलें पूलबंदीची तयारी होत आहे पूल तयार जालियानंतर पांच सात हजार कदलबाश वगैरे खंडेरायाबराबर देऊन पार पाठऊन रसद बंद करावी हे वजीर आजमचें वर्तमान पठाणाकडील वर्तमान तर पठाण हा मार्ग पाहतात जे यांची गठडी जे आहे हे फुटली व पार गेले म्हणजे नीट वजीर आजमास पाहावें व पारच्या फौजानी पार जातील त्यास विल्हे लावावें त्यांस हे मसलहत वजीर आजमास कोण देतो हे कळत नाही उभयेता सुभेदार वजीर आजमचें रक्षण करितात वजीर आजमला पाहिजे जे प्रथम आपले संरक्षण करावे आपल्या संरक्षणार्थ उभयता सुभेदार सनीध असूं द्यावे व तमाम फौजेनसीं जिकडे [लागे] तिकडे जावें त्यास ते

म्हणतात त्यास बैल रोकल्याने तरवार रोकते कीं काय बहुधा हे अकल कुंवर बाहादूरजीची दिसते त्यास दगा न खात तें करणें रसायन राखून तिकडून पाय निघे तें करणें नवाब बाहादुरांही भिकाजीपंतास सांगितलें जे तुम्ही माधोसिंगाचे साहित्यास्तव येऊन राण्याची व हाड्यांची फौज येकवट करून येत असतां अयामलाचे भावानी तुम्हास लुटून घेतले त्याप्रा पठाणाच्या हंगामियात न करणें व बादफते तुम्ही येऊन भेटाल व सांगा [ ल ]

२

तेंव्हा मुनासब असेल तो अर्ज करू पत्राचें उतर दिल्हे तेंव्हा भिकाजीपंताही खलित्याविसी अर्ज केला नवाब बाहादुराही म्हटलें जे हरगाह दामोदरपंतास खलिता बात नाही तेथें यांस खलिता कसा होईल बलकी धाकटी मोहर मी करणार नाही नागरमलास सांगितले जे तू आपली मोहर करूं दे त्याजवरून त्यानी थोर मोहर करून दिल्ही त्याची नकल बजिनस आम्हाजवली पाठविली ते बजिनस तुम्हाकडे पाठविली असे अक्षरशाह मनन करून रा सुभेदारास दास्तवर्णे सलाह आहे येथें ब्राम्हणा....लिंगे खाविंदावर प्रयोग केले आहेत असे लोक बोलतात त्यास हे आम्ही पुर्ते जाणतों जे सुभेदारासारिखा येकनिष्ट चाकर मागे जालाही नाही व पुढेही होणार नाही खंडेरावही काय जाणें कोण्ही हिंदुस्थानी हरामनिमक च्यार कागद लिहून मोहर करून घेत असेल त्यास काय विनवीत असतील हे नकले यैस्या गोष्टीने यांचा चवकार जातो जे विहीत जाणतील ते करतील तुम्हास कलावें म्हणून लिहिलें असे श्रीमंत स्वामीचे पत्र नवाब निजामनमुलूक बाहादूर यांस सैद लश्करखानाच्या विद्यमाने आलें याची नकल बजिनस पाठविली आहे त्याजवरून कलेल हे तुमचा मार्ग लक्षितात व पांचवे तारखेस येथून कूचही करणार हाफिजुदीखां महमद सईदखां व शरफुदौले व अली कुलीखां वगैरे येका दो दिवस रुकसत होऊन त्यांजबराबर जाणार हेही येश आपल्यास यांवे यैसे वाटतें त्यास पठाणाचे येशावर मवकूफ आहे जें होऊन ते खरें आसफजाहची तिर्थे मुले नीट श्रीमंताचे घरास येऊन तुमच्या [ घरांत ] आलों म्हणून म्हटले मसलंदीवर बसत नव्हते श्रीमंती अत्याग्रह केला तर्‍ही हेंच म्हणाले जे आम्हास निजामनमुलुकाचा जागां तुम्ही आहा ज्याप्रा त्यांची मर्यादा आम्हास करणें त्याजप्रा तुमचीही करणें श्रीमंत बहुत खुश जाले पंधरा लाख रुा सैद लश्कर खानापासून घेतले होते त्यांतून दोन लाख रुा दिल्हे म्हणतात व मोत्याची माला त्याचे दिवाणास सरफराज केली त्यावरून नवाब निजामनमुलूक बहुत खुश जाले व मुलास रागास येऊन लिहिले जे तुम्हास काय खायास नव्हते म्हणून दोन लाख रुा घेतले अतःपर पाठऊन देणे ते म्हणातील ते करणें व जेथें म्हणतील तेथे त्यांच्या बराबर तरतूद करणें आणि मजला पोंहचणें जाणने [ नि॥ ] तुमचें येणें होऊन भेटी सत्वर होय ते करणें नासिकची पत्रें बजिनस पाठविलीं असेत हली श्रीकाकूची वृधावस्था याकरितां जाऊन पाहावे हें चिती होतें श्रीकृपेकरून

मातुश्रीस आरोग्यही होईल कोणे गोष्टीची चिंता न करणें वजीर आजमला सांगणें जे तुम्ही खंडेरायाकडून भलताच......जी गोष्ट सागाता त्यासी व [न]बाब बहादुरास लिहिता त्यासी हे सर्व तुमचे मित्र आहेत ते तुम्हास कळले नाही इतकी इशारत मात्र असावी व सत्वर तेथून वजीर आजमचा बोलबाला होऊन निघणे होऊन नवाब निजामनमुलकाच्या भेटी होत ते करणें बहूत काय लिहिणें हे असीर्वाद रा त्रिबकपंतास नमस्कार सो गिरमाजी मकुंद कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी देसींहून पत्रें आली तें पाठविली असेत सेवेसी पावतील हे विनंति

---

| | | |
|---|---|---|
| ले. १२<br>पो शाबान २२ | श्रीशंकर<br>पा छ २२ शाबान | श. १६७३ आषाढ वद्य ८<br>इ. १७५१ जुलै ५ |

आसीरवाद उपर माधोसिंग अकबराबाद जाली व दिनानाथ सुभेदारीचा नायेब जाला व त्याच्या तरफेने आगऱ्यांत अमल होऊन झंडा उभा राहिला या गोष्टीवरून रा उभयेथानी बहूत विषम मानिले व स्पष्टवादे बोलले कीं बापूस दिलींत राहाणे आहे व पातशाहास पातशाही करणे आहे तर माधोसिंगाचा सुभा काढावा नाहीं तर बापूचे राहाणे दिलींत होणार नाहीं व पातशाही मुलकासह उपद्रव करूं येैसें स्पष्टवादें बोलले म्हणून विस्तारें लेहलें तरी [बापू] दिलींत बसले आहेत ते सरदारांच्या जोरावर बसले आहेत यैसी यांची मरजी असिली तर इतकी लांब गोष्ट कासास पाहिजे आतांच आम्हांस आज्ञा करावी बापूस उठऊन बोलावितों दिलींत बसऊनही हेच निर्वाह करितात यांचपासींच बसून राहतील मग हे निर्वाह न करीत कीं काये करतीलच करतील दिलींतच काय विशेष आहे पातशाहाही थोर आहेत सरदारही थोर आहेत चितास येईल तें करोत आम्ही सर्व प्रकारें त्यांचे स्वाधीन आहों परंतु येक मोटें आश्चर्य वाटतें कीं बापू पातशाह नाहींत पातशाहाचे नायब नाहींत यांच्या म्हटल्याप्रमाणें पातशाह करीत नाहीं जे इतक्या गोष्टी यांच्या हकांत सरदारानी बोलाव्या आगऱ्याचा सुभा पहिलें त्यांस होताच आतां अनायासें जुलफकारजंग मारला पडला आगऱ्याचे सुभ्याचा तलाश गाजुदीखानानी केला इंतजामुदौलानी केला पातशाहानी त्यास न दिधला माधोसिंगाचे वकिलानी रुा कबुल केले याकरतां त्यांसच दिधला पातशाह देतोसें कळलें आपल्यासही सरदारांच्या हवाल्याबा रुा घेतले पाहिजेत लटकें तुटकें येहसान करून दाखवावें म्हणून मधें येऊन आम्ही करून दिधलें यैसें त्यास दर्शविले वरकडियांच्याच म्हटल्याने होतें यैसें असतें तर हेच आपल्या नांवें सुभा न घेते हे गोष्ट चितांत उमजायाची आहे रागें भरायाची नाहीं त्याहीवर हे माधोसिंगासी नाखूष म्हणून आम्हीं च्यार पत्रें बापूस लिहिली आहेत कीं

माधोसिंगाचा सुभा तगीर करून आणख्यास होय तें करणे जर पातशाहांस पैक्याची व नक्षाची व बंदोबस्ताची गरज आहे तर सरदारांस देववणे पैकाही देतील जागीरदारांचे खाही पावतील मुठमर्दास तंबी करतील सुभ्याचा अमल करारवाके होईल सरदार राजी राहून पातशाही बंदगी ब

२ पा छ २२ शाबान

ज्याऊन आणतील तर हे गोष्ट खामखा होय तें करणे निदान हे नच होय तर नबाब वजिरासी व सरदारांसी श्नेह आहे वजिरासच देववणे परंतु माधोसिंगासी सरदार नाखूष आहेत त्याजवर सहसा न ठीवणे यैसें अजूरदार कासदांबराबर च्यार पत्रें दिलीस पाठविलीं आहेत जर सरदारांचे नावें होतें तर याजपेक्षा मोठी गोष्ट कोणती सरदारांस सुभा मिलतो तुम्हांस आगऱ्याची नायबी मिलते आमचे मनोरथ पूर्ण होतील जर हें कोण्हेही प्रकारें होईना तर निदान वजिरास दिधलें तऱ्हीं सरदारांस विषम तों नाहीं हेंही न होय तेंही न होय खामखा माधोसिंगावरच ठीऊं म्हणतील तर याचे तोडजोड आणीख आहेत जे गोष्टीने माधोसिंग खराब होय पातशाहांस पैसा न मिले पातशाह पायां पडू न देत ते तदबीर केली आहे कोणती म्हणाल तर आगऱ्याचा पैका जाटांचे हातीं त्याचे नवदहा लक्ष रुा माधोसिंगावर आहेत त्यास आम्ही मना केलें कीं तूं येक रुा माधोसिंगास देऊं नको. माधोसिंग तुजवर चढून येईल तर सरदार तुझी कुमक करतील सरदार माधोसिंगाकडे गेले तर त्वा रफीक व्हावें दमैई तोफखाना चालावें त्याने हे गोष्ट कबूल केली व पैकाही पाववावा हे शपथ वाहिली मोहनसिंग रूपरामास आम्हांपासीं ठीऊन गेला हें घेऊन येतो तेथें येतांच हे लक्ष रुाची निशा करतील राहिले तेही कांहीं श्रावण सरतां कांहीं भाद्रपद सरतां विजयादशमीपर्यंत झाडा करील यैसी रुायाचीही वाट केली आहे व सरदारांचे आज्ञेत राहून माधोसिंगास न भेटावेसेंही केले आहे त्याजला समाधानाचे पत्र बहूत गर्मीने पाठविल्या मर्जीनुरूप करील इतकेंही येकीकडे मीं सरदारांपासीं येतों तोंवर दिलीचे वगैरे काय जाब येतात तेही पाहा निदान मजला दिलीस पाठवोत जे सरदारांच्या चित्तांत असेल यावत्‌शक्ति त्याच गोष्टीची पैरवी करीन याप्रकारें आम्हीं सरदारांची रजावंदी साधावयास अर्थे प्राणे तत्पर आसतां आम्हांसच मारू म्हणत आसले तर इछा त्यांचीं आम्हीं त्याचे पदरींच आहों चित्तास येईल तें करोत आम्हीं [नि.*] कोणेही प्रकारे सरदाराचे चाकरीस कमी केलीं नाहीं व पुढेही करणार नाहीं ये गोष्टीची निशा त्यानी असू द्यावी बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. १३ पौ शाबान २२ } श्री पा छ २२ शाबान { श. १६७३ आषाढ वद्य ८ इ. १७५१ जुलै ५

आसीर्वाद बदरुल इस्लामखानाचा मजकूर लेहला की थोड्याबहुतावर म्हणाल तर फैसल करूं म्हणून लिहिले तर रुा फरफरोईचे नाहींत कीं थोड्या बहुतावर फैसल करावें तलबेचे रुा त्यानी तनख्वा दिघली तेव्हां रुा तबेंत वजा जाले यांत जो रुा उणा आला तो आपला बुडाला याकरतां त्याजपासून ३५२०० पसतीस हजार दोंशाचे तमसूक लेहून घ्यावें त्यांत सध्य देत आसेल तें सध्य घ्यावें बाकीचे वायेदे मुदत लेहून घ्यावी रुा त्याच्या गळां मढावे निशां करून घ्यावी आगेमागे रुा देईल या गोष्टीचा हामी मिळे तर उतम दमाजी गाईकवाड वगैरे कैद केले रेणकोपंत महादाजीपंत कामाविशदारांसुधां गुजराथेस गेले आधी यांच्या मुलकांतून पंचवीस घेतील मग निमे परगणे घेतील निमे त्यांस देतील येवंच गुजराथही दरोबस्त घेतली खरी आपले माहालांचे काय होईल तें पाहावें घरचे लिहिले येईल तेव्हां खरें श्रीमंत पुण्यास आले पांचा हजारा स्वारांची चौकी सातान्यांत बसविली आहे [ नि* ] तेथे वर्तमान येत जाईल ते वरचेवर लिहित जाणे हे आसीरवाद

[ नि.* ] सो विनंति सेवक त्र्यंबक मलारी कृतानेक सा नमस्कार विनंति लिखितार्थ परिसून कृपा केली पो हे विनंति

---

ले. १४ पौ शाबान २२ } श्रीशंकर पा छ २२ शाबान { श. १६७३ आषाढ वद्य ८ इ. १७५१ जुलै ५

आसीर्वाद उपर श्रीच्या सनदेची गोष्ट तो नवाब वजिरानी कबूलच केली परंतु सरदारांचे लिहिले बलवंडसिंगास गेले त्याने त्याची नकल येथे पाठविली तो विस्तार पहिले तुम्हांस लिहिलाच होता तितक्या गोष्टीवर नवाब बोलले होते कीं अद्यापि म्यां सनद दिघलीच नाहीं तों हे अवस्था आहे या शोहरतीने माझे वीस लक्ष रुा बुडतात आम्ही समाधान केले कीं ब्राह्मणाची सिफारश लेहली होती त्या दबावासाठीं चुकून हे गोष्ट लिहिली असेल आतां आम्ही सरदारांची पत्रें आणविली आहेत ते येतील बलवंडसिंगास पाठऊन द्या व मीही लिहून देतों या गोष्टीचा संदेह दूर होईल आपला पैसाटका वसूल करून घ्या आम्ही सनद च्यार महिने शपथपूर्वक गुप्त ठेऊं ऐसा जाबसाल जाला होता ते दोन्ही पत्रें लिहिल्याप्रमाणें सत्वर पाठऊन देणे व [ नि* ] बकसीराम व लक्ष्मण पंतास सवदार पाठवणार ते कासीस गलियावर कोठे बोलतील तर त्यांसही ताकीद करणे ते सरदारांकडोन करवावी जर ते चालतील तर काम बिघडेल

आणि सरदार अम्हावर शब्द ठेवितील यास्तव च्यार महिने ये गोष्टीचा शपथ वाहिल्याप्रमाणे दम धरतीलसे करणे बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

| | | |
|---|---|---|
| ले. १५<br>पौ शाबान २२ | श्रीशंकर<br>पा छ २२ शाबान | श. १६७३ आषाढ वद्य ८<br>इ. १७५१ जुलै ५ |

आसीरवाद उपरी नवाब वजीरुलममालीक यानी हरयेका प्रकारें दुशमन पायमाल करावे या हेतूस्तव सरदारांस देशाची लालूच दाखविली पारच्या मुलकाची लालूच दाखविली छावणीचा खर्चही कबूल केला जेव्हां सरदारानी छावणी करितों हा करार केला बलकी छावणी केलीसें प्रत्यास आलें अहदनामां व बेलभंडार पावला तेव्हां अंदेशांत पडले कीं या छावणीचे तों मी देईन परंतु पठाणाचे मुलकाचा व रोहिल्याचे मुलकाचा तह पातशाह न मानीत व हजूरचा दस्तावेज मजला न देत तर म्यां सनद कसी करून द्यावी सरदार सनद घेतल्यावांचून कसे राहातात यैसा अंदेशा नवाबास प्राप्त जाहाला आम्हांसीं तो स्पष्टवादें या गोष्टी बोलतां न येत तेव्हां आम्हांस तर आज देतों उद्यां देतों या जाब सालांत लाविले व आपण ताबडतोब हजूर लेहून पाठविलें प्रथमता त्याचा जाब आला की येक पठाणाच्या दुशमनीसाठीं अंतरवेदसारखा मुल्क उचलून मऱ्हाट्यास द्यावा हें सहसा मसलहत नाहीं खामखा छावणीच करवणे तर कांहीं द्रव्य मात्र देऊन छावणी करवा व आपलें कार्य करून घ्या या मुलकांत बिघाभर जमीन त्यांजला देणे सलाह नाहीं यैसे जाब आले व हेंही लिहिले की पैका घेऊनही ते न राहेत तर पठाणांत काय जीव आहे पातशाह अंतरवेदीत येऊन फितूर दूर करतील यैसा जाब आला परंतु आम्हीं तों यास पकें वचनी गोविले व हात कापून घेतला व हाही आपले वचनावर कायमच होता तेव्हां मागती याने सरदारांची येकनिष्ठता व पातशाही कामावर यैसे तत्पर आहेत व रास्तबाज आहेत करारांहून येका बिध्यास ज्याजती हात लावणार नाहींत व यांजवेगळा पठाण रोहिल्याचा फितूर कदापि तुटणार नाहीं येकदां यांस सरफराज केले व हा देश दिघला म्हणजे खूब ज्यादा वाढून पातशाही का [मावर सरगरम] राहतील ...उमेदीने....प्रस्तूत जो म्यां तह केला आहे तेणेप्रमाणे....जाला पो यैसें दुसऱ्यानें लिहिले त्याचा जाब आला कीं अंतरवेदीत यांस जागा देणे कदापि सलाह नाहींच तुम्हीं खामखा बजीदच आहा तर कायमखानास आरपार जितकी जागीर होती तितकी याना द्या जागीरदारांचे माहाल व खालशाचे दाम व नवाब कुदसियाचे दाम सहसा होणार नाहींत यैसा दुसरयाने जाब आला तेंव्हा नवाबाने मागती तिसऱ्याने लिहिलें कीं कायमखानास आठा दाहा लक्षाची मात्र जागीर होती तितक्याने यांचे काय होतें जागीरदारांच्या जागीराही यांस द्याव्या जागीरदारांपेक्षां तर हे कामांस

२ पा छ २२ शाबान

आले व पुढेंही येतील व पांच हजार स्वार चाकरीस ठीवितात यास्तव कायम खानाचा दखल ज्या ज्या ठिकाणी होता तो यांस द्यावा येका खालशाच्या दामांत मात्र यानी हात न घालावा हें गोष्ट पहिले म्यां करार केला आहे हजरतनी अतःपर सहसा अंदेशा न करतां आज्ञा द्यावी करारासिवाये यांजपासून तफावत पडला तर मीं जामीन आहे यैसे तिसऱ्याने लिहिले व तीा बापूस लिहिले कीं तूं जावेदखानास बजीद होऊन याप्रो हजूरचा दस्तावेज पाठऊन दे तेंव्हां बापूस तो येजमानाच्या व सरदाराचे कामाचीं उत्कंठा विशेष तीन च्यार दिवस जावेदखानास अतिपय बजीद जाले व जसजसे नबाबाने सरदाराच्या तरफेने खातरजमा करून लिहिले होतें त्यापेक्षा विशेष निशां केली त्यास आज नबाब बहादूर बजाये पातशाह आहे वजिराची बजीदी व बापूजी बजीदी पाहून त्याने पातशाहांस अर्ज करून नबाब वजिरास परवाणगी पाठविली कीं सिवाये खालिसे व सिवाये नबाब कुदसिया कायमखानाखालें मुल्क होता तो बशर्त पांच हजार स्वार व तंदी पठाण व रोहिले करारवाके द्या व रोहिल्याचा मुल्क सर जाल्यावर निमेनीम यैसी परवाणगी मोठ्या जोराने आली तेंव्हां नबाब वजिरानी बोलाऊन सांगितले कीं या कामांस इत्का जोर म्या मारला व इतके बळ तुमच्या भावास करणे लागले तेंव्हां हे काम जालें अतःपर सिवाये खालसा व सिवाय जागीर नबाब कुदसिया सनद करून देतों आम्हीं अर्ज केला कीं येक खालशाच्या दामांचींच गोष्ट ते मानीत नाहींत नबाब कुदसिया कोठून काढली ते माननार नाहींत नबाब बोलले कीं हें घर पातशाहांचे आहे चिमटी घेऊन काम सहसा करूं नये सलूक समाधानाने केले तर बहुत दिवस चालतें सरदारांसही हेच उचित आहे कीं पातशाहांस हातीं ठिवावें त्याजमधें विशये किती खालशाच्या दामांचे तीन लक्ष रुा व नबाब कुदसियाचे वगैरे लाख सवा लाख येकूण चौं सवा चौंची बाा आहे खालशा तून आमील येईल त्यास दखल द्या नाहीं तर तुम्हीच ताहूद लेहून देऊन साल दर साल रुा देत जा आमासे सावकारी चलण धरा कीं आणीख दाहा परगण्याचे इजाऱ्याचा विश्वास पडे येव्हड्यासाठीं अवघें काम मुलतवी टाकणे सलाह नाही व इतकी बलकटी जाली असतां माझ्याने खालसांचे दाम व नबाब कुदसियाचे दाम देवत नाहींत मुतसद्यांस आज्ञा दिधली कीं हजूरच्या हुकुमाप्रो सिवाये दाम खालसा व सिवाय कुदसिया सनद करून द्या यैसी आज्ञा जाली त्यास आम्ही कसी

३ पा छ २२ शाबान

सनद घ्यावी मेहनत बरबाद गुन्हा लाजीम जाला तर काय करावें या करतां सविस्तर वर्तमान तुम्हांस लिहिले असे अक्षरशा रा उभयेथां सरदारांस व रा तात्या व रा आबाजी व रा भाऊन वांचून दाखवणे खालशाच्या दामा-

सिवाये व नवाब कुदसियाचे दामासिवाये सनद होते आज्ञा निखालस आसलियां घेऊं उद्यां आम्हांवर शब्द न ठीवावा याजसाठी खोलून लिहिले आहे खालशाचे दाम व नवाब कुदसियाचे दाम वेगले करून सनद घेऊन या येसें पत्र सरदारांचे आले म्हणजे सनद घेऊन नाहींतर जशी आज्ञा करतील यसें करूं [नि॰] या पत्राचे उतर जलदीने पाठवणे सरदार अज्ञा करतील तेणेप्रमाणेच केले जाईल बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. १६ | ॥ श्री ॥ | श. १६७३ आश्विन शुद्ध १
सं. १८०८ आश्विन शुद्ध १ | | इ. १७५१ सप्टेंबर ९

॥। साधश्री सरववौपमा ज्यौग्य रावजी श्रीदामौदरजी जौगी लिषतं वकसीरामकेनी पाय लागूनं वंचा अठाका समचार भला छै आपैका सदा भला चाहिजो अप्रं ची आपसो विदा होय आया सो श्रीप्रगसो तो कागद भेज्या ही छा जिस पाछे मिति आसौज वदी १२ ने दो पहरने श्रीकासीजी पोहुच्या चौदसने डेराके ऊट वा अखबार आये सो मिलाय तो राजासो हुवा न्ही ऐक दो दीनमै होसी और इठाकी सूरत यह छै जो कासीके सारे साहूकार पकडे छै सो कदी वीस लाख मागे छै...दी पदरा मागे छै सो वे यह कहे छै आगे दो लाष रुपै आम्हासो उधार लिआ सो दिआ न छै अब म्हे कौठासो द्या सो ये सषती किआ चाहे छै सो य...आपभी मुनासब जानो से...ने इनसो...मनी नही होवे देवे...सारा सहर लूट लेवे तौ इन...का चारा न्ही जीहसू अपने लिखा छा जो यह बात सरदारोको आछी न लागेगी तो चालता मी फुरमाई छी और आपनेभी लिखी आई छै श्रीकासीजीका बसवावालाने किसी बातकी खेचल होबा पावे न्ही और नवावे साहबमी फुरमाई जो किसीपर जुलम होबा पावे न्ही सो जीहसू आपने लिपा छा जो सारी कासीमै हटताल होय रही छै और त्राह त्राह होय रही छै सो नवाब साहबसो अरज...१ सीता इठाका...वालनेनी...की दिकत न...आर...वा सो असवार मेजवा की तागीद छै सो भेजा छा और सेष महंमद असलैहने आपकी हजूर राष आया छा...वाहने सीष दी होसी और कदाचि कामके सबब सो रहै वा हुवा होसी तौ अब सिताब सिष दीजेगी और कागदवाला काम हुवा होय तौ वसूल लिषाय भेज दीजेगा और न होता जानौ तौ कागद भिजवा दीजेगा ढीली करनी न्ही और स्माचार दिली वा सवाई ज्यैपूरका वा देसका आया होय सो क्रिपाकर लिषजेगा और पडवाको लछमन पंडितने श्रीगयाजीका विचार किआ छा सो हाल तो दो चार दिन रह्या छै दो चार दिन पाछे कामकी सुरत हुवा पाछे होसी सों लिषाला क्रिपाकर कागद स्माचार हमेस्या याद फुरमावोला मिति आसौज सुदि १ सव १८०८

[ समाप्त* ] पंडित साहनजी श्रीत्रिमकरावजीसो म्हाकी पा लागून मालूम होय और स्माचार कागदसो जाणोला

---

| | | |
|---|---|---|
| ले. १७<br>पौ जिल्काद २१ | २<br>छ २१ जिल्काद | श. १६७३ आश्विन वद्य ८<br>इ. १७५१ आक्टोबर १ |

परभारें यास फर्मान आला मग कोण्हास पुसतो व आम्हांस जागीर कां देईल सहसा देणार नाहीं या प्रसंगीं तुमची कारीगिरी हेंच कीं पुन्हां गाजुदीखानास बाहेर काढून दाहा वीस पंचवीस हजार फौज जमाव करऊन इकडे चाल करावी जर गाजुदीखानाचा निग्रहच आसिला तर उतमच्च जाले सरदारही तेंच प्रांती आहेत आपली मातबर फौज व सरदारांस घेऊन यावें आम्हीही इकडे तयार आहों सर्व येकत्र होऊन सलाबतजंगास ठिकाणी लाऊन दक्षण देश उभयेथा वांटून घेऊं जर गाजुदीखानास निग्रह कर्तव्य नसला तर बाहेर निघून पांच सात मजली यावें आम्ही यास दबाऊन आपलेही जागीर वगैरे कामकाज करून घेऊं व गाजुदीखानाकारणेंही कांहीं फौजेचा खर्च म्हणून व कांही साल दर साल ठेराऊन नियाबतीवर राजी करून भावाचा श्रेह करून देऊं या गोष्टीने आमचेही काम होईल व त्यांचेही होईल जर हेही न बने तर सलाबतजंगाची सनद कोण्हेही प्रकारें अटकाऊन टाकणे अथवा आपले विद्यमाने फर्मान घेऊन चिरंजीव नानाबाार आम्हांपासीं पाठवणे कीं सलाबतजंगास आसानमंद करून आम्ही आपलें कार्य करून घेऊं यैसीं श्रीमंत स्वामीचीं पत्रांवर पत्रें तीा बापूस आलीं त्यास साहेबकाम तर केलें पो व हजूरचा...म्हणाल तर पातशा व नवाब बहादुर लोभी आशेंत गुंतले सलाबतजंगात न देतां आतां गाजुदीखानास कसे देतील तेव्हा जितके रुा सलाबतजंगाने कबूल केले तितके गाजुदीखानाकडून कबूल करविले व जितके त्याने पाठविले तितके रोख याजकडून देवविती यैसें ठहराविलें परंतु यांस धीर पुरेना कीं गाजुदीखां जाऊन काय करतील आतां दाहापांच लक्ष मात्र देतील ते देतील पुढें कांही हाती लागणार नाहीं यैसा यांला धीर पुरेना आम्हांस तों सर्वापेक्षा स्वामीकार्य प्राधान्य तेव्हां आम्हीं गाजुदीखानाकडूनही बोलविले व आम्ही गरिछिनवादे पातशाहांस व जावेदखानास अर्ज केला कीं गाजुदीखां सुभेदार होऊन बाहेर निघाले तेंव्हा बशर्त कुमक करारवाके श्रीमंतांस करोड रुा देऊं केले आपल्या मोहरेनसी फर्द कोरी सरदारांपासीं लिहून पाठविली ते फर्द बजिनस सरदारांपासी आहे आतां तुम्हीं रुाच्या लालचीने गाजुदीखानास मौकूफ करून सलाबतजंगास देऊं म्हणता तर काय चिंता आहे द्या परंतु आमचे क्रोड रुा कोणीकडे लाविता ते लावा मग फर्मान द्या जर सलबतजंगास देणे तर जसी तुम्हीं आपल्यास सतरी लक्षांची निशां घेता तसी आमच्याही क्रोडाची निशां घ्या मग फर्मान द्या नाहीं

छ २१ जिल्काद

तर फर्मान आमच्या हवाला करा आम्हीं तुमच्या शाचीही निशां करून घेतों व आम्ही आपल्या क्रोडांचीही वाट करून ‹ करून › घेतों जर तुम्हीं हे गोष्ट खातरेस न आणाल व आपले काम करून परभारें सलाबतजंगास फर्मान द्याल तर गाजुदीखानास आमचे हवाला करा हेंही न कराल तर आमचा दावा तुम्हांसी सरदार कामें जाली म्हणजे या गोष्टीचा जाबसाल तुम्हांसी करतील येैशा गोष्टी पट्टवादे नवाब बहादुरास सांगितल्या हे वर्तमान आयकून स्तब्ध जाले व तेच दिवसी रात्रीं येकांतीं गाजुदीखानास पुसिलें कीं तुम्हीं कोरी फर्द मोहर करून देऊन क्रोड शाचा करार केला आहे कीं काये गाजुदीखानानी यथार्थ म्हटले तेव्हां पातशाह नवाब बहादुर बोलले कीं आम्हांस पुसल्यावांचून कसी फर्द लेहून दिधली गाजुदीखानानी अर्ज केला कीं वजिरानी पनास लक्ष सरदारांस देऊं करून बोलाविले तेंव्हां हजरतला कोठे पुसिले होतें जिकडून काम निघेल तिकडून केलें पो याकरतां आम्हींही कार्य जाणून लिहून दिधले येैसा यकरार गाजुदीखानानी करतांच पातशाह व नवाब बहादूर चपापले व चिंता निर्माण जाली कीं आता काय करावें परंतु सरदारांचे लिहिल्यावांचून या कामांत पुर्ता जीव पडत नाहीं याकरतां मसोदे करून पाठविले आहेत येणेप्रमाणे येक दोन तीन पत्रें येकामागें येक चौ चौ दिवसांचे अंतरे जासुदांबाार नवाब बहादुरास दिलीस पाठवावी व येणेप्रमाणेच वजिराचे नांवची इकडे पाठवावी की तेणेप्रमाणे आम्हीं वजिराकडून नवाब बहादुरास लेहऊ दोंहीकडून पत्रें पावल्याने गोष्ट गरम होईल व बापूंचे म्हटल्यात जीव पडून जे रीतीने स्वामीकार्याची साधना घडे तें करतील आम्हीं तर सांगितल्या कामांचे सर्व यष सरदारांचे आहे हे पुरवणी तुम्हीं दोन तीनदां वाचून उतम प्रकारें अर्थ ध्यानांत आणून रा उभयथांसही येक दोनदां वाचून दाखऊन लिहिल्याप्रमाणे दिलीसही पत्रें पाठवणे व वजिराचीही आम्हाकडे पाठवणे हें पत्रें पावल्यावर कसकसा रंग पडतो तसतसा जोडतोड मागती करां येवंच याही कामांचे यष सरदारांचें पदरी घालावें हे गोष्टीचा निश्चय आम्हीं आपले ठाई केला आहे तर [नि*]मसोद्याप्रमाणे पत्रें पाठवणे बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

| | | |
|---|---|---|
| ले. १८<br>रवल १ | पौ छ १३ राखर | श. १६७३ माघ शुद्ध ३<br>इ. १७५२ जानेवारी ८ |

सो कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ १ माहे राल मुकाम जैनगर स्वामीचे कृपाकटाक्षें येथास्थीत असे विशेष बहूत दिवस जाहले स्वामीकडील कृपापत्र पाऊन चितासी समाधान प्राप्ति न जाहलें याजकरितां अहिर्निष चित सचीत असे तरी स्वामीनी येणारासमागमे कृपापत्रीं

सांभालीत असिलें पाहिजे इकडील प्रसंग तरी दिवानजीनी बहुतेक खासदसखती शुका इबूल करून पाटविला होता तो त्यांचे पुत्राचे जवेंत पांच सात दिवसवर पडला होता व फर्मानबाडीही त्याजकारणें येक दोनी दिवस उभी राहिली होती ते काली श्रीनी स्वार होऊन शुका घेऊन अदब बजाऊन आणून परभारें शिकार खेलायानिमित्य जाऊन प्रहरा रात्रीस येऊन महलदाखल जाहले शुक्यांत काहीं बहुतसा अशये नव्हता हरी गोविंद राजे यासी हुजूर पाठविले बहूत बरें केले यांजवरून नकश अबूदियतेचा कलला. तुमचे वडिलांवडिलापासून सिवाये खान· जादगी दुसरी गोष्ट जाहली नाही पुढें तैसीच वर्त...ल कीं जेणेंकरून तफजु...त जाये नवाब बहादूर...सबा व जागीर बदस्तूर...[ब]हाल केली असे मनकूर नवाजशेचा म्हणायास इतका मात्र लिहिला होता तुम्याचे असालतनेची नजर दिवानजीचे पुत्राने दाखविली होती व या शुक्यावरूनही मोटा भ्रम होता तो सर्व निघून आला त्यांत या मजकुरासिवाये दुसरी गोष्ट नव्हती न कलें कसा काये प्रसंग आहे जागीरदारांही इतके दिवस पटाणाचे अमदनीकरितां तगादा केला नसेल व हुजूरच्यांतही खातरदारी याजकरितांच विशेषेकरून होती अतां पठाणाचा तो प्रसंग जाहला जे येक मीरमनूने मारून हटविला व तमाम बादशातची बाजी रक्षिलीसी केली याजवरून तुरानियाची बाजी सरसी दिसोन आली इतकियावर त्यांची खातरदारी टाकून यांसी कोण सुबेदारी कोणे कर्तुत्वावरून देईल आधींच त्यांसी यांही काये रस रक्षिला यासिवाये दुसरें अणखीही काम तर निधणे कठीणसें दिसतें राजा हा कालवरी तर त्याजवरी संतुष्टच अहे परंतु सेवटीं फिरतांही विलंब नाही किमर्थ कीं मनोरथराम व्यास जो मोठे माहाराजां- देखता देवढीचा दारो[गा]...त्यासी दिवानजीनी......

---

| | | |
|---|---|---|
| ले. १९<br>रवल ८ | श्री<br>पौ छ १४ रावल | श. १६७३ माघ शुद्ध १०<br>इ. १७५२ जानेवारी १५ |

श्रियासह चिरंजीव राजश्री दादा व नाना यासि बापूजी माहादेव अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ ८ माहे रावल मु॥ इंद्रप्रस्थ जाणून स्वकुशल लिहिणें विशेष पेशजी जबाबी कासिदासमागमें साकल्य लिहून पाठविलें असे त्याजवरून सविस्तर कलेल दारा शुको आणि औरंगजेब हे उभयथा अजमेरी- जवली झुंजले तेंव्हा जोतिशाने सांगितलें जे मेघडंबरींत पातशाहा स्वार होईल तर मारला जाईल ते समई सेख मीर याणी विडा उचलून मेघडंबरांत तोच स्वार जाहाला आणि तसदूक जाहाला त्याचे पुत्रास बकशीगिरी फर्माऊन कचेरी लाल फर्माविली त्यास आमचा खाविंद पातशाहाच्या म्हटल्यावर झुंजले असता त्याचे तजविजीने दक्षणची सुबेदारी मुकरर न केली तर पातशाहाचा निगेबान कोण नवाबही पातशाहास व नवाब बाहादुरास लिा व सरदारांची पत्रें आलिया-

वरून बहूत सर्द होऊन निजामनमुल्कास म्हणतात जे तुम्ही त्यांचे विचाराखेरीज सुबेदारी आम्हाजवल घ्या त्याशी हे काम क्षेपनिक्षेप नवाबास करणे आहे व जसे पातशाहास पाणिपतावर पातशाह करून पातशाहास हातांत घेतले तसे निजामनमुल्कास सुबेदारीचा खिलअत देविल्याने सर्व उमराव घरांत आलेसे होतील तरी हें कोणें प्रकारें घरांत येतील यांसी भीक मागणे बरें वाटतें परंतु यांचे हातून सुबेदार होणें बरें वाटत नाही परंतु लाच्यारीकरितां कबूल करतील तरी लाच्यारीची वाट कोणती म्हटल्यास नवाब वजीर अजम आहेत दिवाणी दक्षणची व बकशीगिरी हे दोन्ही तालोके नवाबांचे आहेत त्याशी दोन्ही आपण सरफराज कराव्या त्यासी बकशीगिरी ज्यापास त्याची कचेरी लाल असते दुसरे दिवाणी ज्यास सरदार म्हणतील त्याशी द्यावी तोपर्यंत दोन्ही कचेऱ्या व डेरा मातबर तयार करून तुम्ही गणमुक्तेश्वरास येता तोपर्यंत बदस्तूर दक्षण डेरे सुबेदारांसाठी करून आणू मग हजूर येऊन दक्षणची तसलिमात करावी मग निजामनमुल्कास घेऊन जाऊन यांसीच कायम करावे अथवा यासी मुरबी ठीऊन सलाबतजंग शरण आलियावर ठिवावें निजामनमुल्कानी मोहर कोरे कागदावर केली म्हणून रुपये मागावे म्हणता त्याशी याजला अरजूहें जे मी सुबेदारी याशी देवीन व यांचा यख्तियार ठीवीन तरी साल बसाल

२ पो छ १४ रावल

मजला पंन्नास लाख रुपये मिलतील म्हणून त्याचे साठ लाख रुपये नख्त नयाबतीसाठी आले असतां निजामनमुल्कानी फेकून दिधले या गोष्टीस केशोराव हफीजुदीखां बानीकार आहेत जेव्हा याणी कबूल न केले तेंव्हा त्याणी नवाब बाहादुरास मुरबी केलें आतां नवाब आमचे मुरबी होतात तरी आधी दिवाणी व बकशीगिरी सरफराज करावी आणि याकूतखानास लिहावे जे बदस्तूर दक्षण डेरे व राहोट्या पातशाही कचेरीच्या तयार विसा दिवसांत करणें तोपर्यंत गणमुक्तेश्वराजवली आम्ही पोहचतों [नि*] बहूत काय लिहिणे हे अशीर्वाद

---

ले. २० } श्रीशंकर { श. १६७३ पौष
इ. १७५२ जानेवारी

विनंती उपरि रा० गोविंद बलाळाचे पत्र रा० सुबेदारांस आलें त्यांत देसचे वर्तमान लिहिले आहे कीं ताराऊसी व राज्यासी पंतप्रधान स्वामीचा सलूक जाला कितीक मतालब श्रीमंत स्वामीचे त्यानीं कबूल केले येक तर हाच की राजश्रीनीं निमे गुजरात दिधली होती त्याप्रमाणे आतांही ताराऊने निमे गुजरात दाभाडे व निमे श्रीमंत स्वामी याप्रमाणे ठैराऊन कजिया तोडला दुसरी आडही प्रतिनिधीचे किल्याची होती तो किला चिटनिसापासून मागती प्रतिनिधीस दिधला

याप्रमाणे कितीक मतलब ताराऊने याचे कबूल करून बोलाविले त्याशी ताराऊ व रंगराजी गडाखाले उतरली व श्रीमंत स्वामी दो हजारा स्वारानसी सातारां गेले इकडे सलाबतजंगासीही सलूक जाला श्रीमंत स्वामी सलाबतजंगापाशी नवी जागीर पनास लक्षाची मागत होते व तो उलटी आणखीच गोष्ट सागून जे रुपये नासरजंगाचे मर...ण्यात यानी तहसील केले त्याची तलब करून जुजास सिध होता ते गोष्ट राहिली यानी नवी जागीर मागणे सोडली व त्याने ते पैसे सोडले व ज्याप्रमाणे कदीम चालत आले आहे त्याप्रमाणे चालू द्यावे व जो खजाना बगणपुरांत नारो शंकराचा घेतला होता तो परतून दिघला इतकी गोष्ट ठैरऊन सलूक जाला दुसरे नासरजंगाचे स्त्रीने श्रीमंतास वीस लक्ष या शर्तीवर देऊ केले कीं फेरोजजंगाची बलायेश करावी हे नविस्तरवांद सलाबतजंगाचे हातास आली त्याने नासरजंगाचे स्त्रीस पुसिले तिने साफ सागितले की हे गोष्ट खरीच परंतु इतका दवळा करावयास सागितले नवते याप्रकारे त्याचे घरांतही करकर आहे सलाबतजंगाचा हाही मुदा होता की दाभाड्यास गुजरात आर्धी द्यावी त्यासी आनायासें तेही गोष्टी बनून आली याप्रमाणे तपसीलवार रो गोविंदपंती रो सुबेदारांत लिहिले आहे कार्याकारण जे नवाब साहेबास विनंति करायाची ते वडील करतीलच कलले पां जानोजी निंबालकराने बदस्तूर साबिक यखलास ठैराऊन दाभाडियास सोडावेसें केले तराऊचीही रजामंदी याच गोस्टीने जाली ते केले म्हणून वर्तमान सत्यमिथ्या अपले लिहिले येईल तेव्हा कलेल बहुधा असेलही गोस्ट खरीच का की चहूकडे गवगावा श्रीमंताच्याने न करवे व. त्यास राजा व अऊ मिळून अपल्यास कुशमांड करितील करितात हे तोडावे ऐसे ध्यानात अणून श्रीमती केले असेल तर न कले दाभाडियाचे अणीखही बत येकिलें की. करोड रुा देऊन सुटला हे बत दिलीची खबर अहे तेही बापूचे लिहिले नाही येकिलेले अहे वडिळास कलावेनिमित्य लिहिले असे हे विनंति

उदईक कटूरी मुा होऊन पूल तेथेच तयार होईल भेटीचेही ठीक करितो तोवर वडिलीही अले पाहिजे हे विनंती पुलावरही येकदोन दिवस अटकाव करून अणीखही तजवीज वडील अलियांवर करितील ते होईल अम्ही हलऊन पाहिले परंतु डगमगीत नाही सुबेदार अशा धरीत नाही की अटकून राहे यास्तव सत्वरच उतरायाची ब्राड अम्ही देत असतो हे विनंती

---

| | | |
|---|---|---|
| ले. २१<br>पौ १ बखर | श्री<br>पौ छ १ जमादिलाखर | श. १६७४ वैशाख शुद्ध २<br>इ. १७५२ एप्रिल ५ |

पुा चिरंजिवास आसीर्वाद उपरी रा जयाजी सिंदे यांची अर्जदास्त व नवाब बाहादूर व नवाब निजामनमुलुकास यैस्या तीन थैल्या व फर्दा दोन गांवा